


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






संपादक - प्रा. रामचंद्र श्रीपाद जोग

| | | | |
|---|---|---|---|
| ५९ | वर्ष १८ | अंक १ | जानेवारी १९७४ |
| ६० | | २ | एप्रिल ,, |
| ६१ | | ३ | जुलै ५ |
| ६२ | | ४ | ऑक्टोबर ,, |

महाराष्ट्र - साहित्य - परिषद्

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

[ त्रैमासिक ]




६९

संपादक — प्रा. रामचंद्र श्रीपाद जोग
अेम्.अे.

पौष १८६५

वर्ष १७ वें ] जानेवारी १९४४ [ अंक १ ला



# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



वर्ष १७ वें ] अनुक्रमणिका [ अंक १ ला

(अंक ६९)

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



## कर्ण

(श्री. बा. सी. मर्ढेकर)

**सर्व तारकांचें समूहगान (Chorus) —**

निळया नभावर चिरंतनाचीं संतत घुमवित गाणीं,
अनंतांत या अशीं पांगलों आम्ही साऱ्या जणी.
विश्वपटावर विविघटनांचीं सदा सरकती कुणी
अगम्य संकेताने चित्रें, बघतों साऱ्या जणी.
अनाद्यंत हा काल, न मिटली कधि अमुची पापणी,
त्रिकालदर्शी म्हणून झालों आम्ही साऱ्या जणी!

**आनंदी तारकांचें समूहगान—**

अमुचीं हृदयें दास्याचीं । शौर्याचीं, औदार्याचीं,
पावित्र्यें भरलेल्यांचीं । भाग्यवंत यशवंतांचीं;
गाणीं हीं सार्थकतेचीं । आशेने फुललेल्यांचीं,
आकांक्षासाफल्यांचीं । प्रेमाचीं, आनंदाचीं !!

**दुःखी तारकांचें समूहगान—**

काहूर, आर्त बेसूर, ऐकुं ये दूर आमुचें गान,
  पडसाद फक्त हे तेजोभंगांतून!
जग भोळें, भोळें फिरे, शक्ति बावरे भ्रमवि जी सकलां,
  ना दया न माया समर्थ त्या धुंदीला!
कारुण्य, कष्ट-वैकल्य, नीति-चांचल्य, आणि नैराश्य,
  दौर्बल्य, अपेशी दुर्दैवाचें हृदय!

**सर्व तारकांचें समूहगान—**

ब्रह्मांडाचा चलच्चित्रपट बघतां हा साजणी,
  वसुंधरेच्या कुरुक्षेत्रावर नजर मारली कुणीं?
अग्ररथावर धीरोद्धत हा कौरवसैन्याग्रणी
  कोण विराजे जयविश्वासें? लवली कां पापणी?
संगरलाली मुखकमलावर बाहुबलातें कथी,
  सूर्यपुत्र हा, पांडव पहिला! शल्य न कां सारथी!
उधळति वाजी, गजकक्षांकित फडके ध्वज हा वरी,
  निळया अंगणीं साद उमटवी शल्याची वैखरी :









शल्य—

कां व्यर्थ मदोन्मत्त ! कुठे पार्थ, कुठे तूं । राधेय जिगीषू
आचार्य जिथें भीष्म तसे द्रोण हरावे । त्वां तेथ न जावें
देवेन्द्र जया रक्षि, जया शंकर मित्र । अन् कृष्ण अरत्र
राधेय, तया खास जयश्रीच सदैव । अन्या न सुदैव
गांडीव टणत्कार, सुटे बाण अजिंक्य । थांबेल अशक्य
जो अर्जुन की सिंहच सक्रोध नि सिद्ध । तूंतें शरविद्ध
चीत्कार तदा मत्त जसा हत्ति वनांत । करशील रणांत !

कर्ण—

मद्राधिपा चित्त निश्चित ठेवी ! मनोभंग या अंगराजास ना
ठावा कधीही ! कधीही न राधेय विश्वासला देवदेवांवरी !
बाहूंत शक्ती नि कर्तव्य जाणीव ! माझेंच सामर्थ्य मातें पुरे
संहारण्या पंडुपुत्रास, येवोत एकेक, वा सर्व, कर्णावरी !

शल्य—

वाचाळ तुझा गर्व क्षणार्धांत निमेल । अन् विश्व हंसेल
आकंठ यदा शोणित शोपून तुझें रे । संतुष्ट पशू रे
कौंतेय कुठे हंस ! कुठे तूं न बलाक । सूतात्मज काक
उड्डाण करी सागर पाहून अपार । स्पर्धा न विचार
पंखांत यदा शक्ति नुरे गात्रिं न त्राण । तैं जातिल प्राण
या फोल जिगीषेंत तुझा होइल अंत । अन् शान्त कृतान्त !

कर्ण—

शल्या ! पुरे मित्रनिर्भर्त्सना ही ! पुढे हाक आता रथा सत्वर !
सूतात्मजा जन्म दैवें, परंतू कृती पौरुषा, कीर्ति स्वायत्त रे !
नाही कधी द्रोह केला स्वलोकां, जया अेकदा मित्र मी मानिला
त्याच्या सहायार्थ विश्वाशिंही झुंज ! घेई न मागे कदा पावला !

शल्य—

राधेय, तथास्तू च जरी व्यर्थ बढाअी । तूझी न लढाअी
हे अश्व पहा टाप न लावीत धरेला । नेतात रथाला !

सर्व तारकांचें समूहगान—

क्षणांत झडल्या समरदुंदुभी ! शंख नादले झणीं !
पुनश्च भिडल्या कौरवसेना–पांडवसेना रणीं.
रथी धावले महारथी अन् तुंबळले अतिरथी,
खड्ग नाचलें कवचावरती, ढाल पडे पालथी !
उग्र देवता संग्रामाची भीषण आरक्तली नू–
मांसकर्दमीं रक्तनद्यांनी शवशकलें झाकलीं.
त्यांत राजले महाप्रतापी योद्धे कर्णार्जुन,

परस्परांना शरसंधाने अस्त्रास्त्रें विंधुन !
अंतरिक्ष हें मरून गेलें देवदानवांनी,
यक्ष-किन्नरी, गंधर्वांनी, मुनी अप्सरांनी !
वीरश्रीचा प्रकर्ष बघतां सारे संदेहले न्–
"विजयश्रीची माळ अर्जुना!" ब्रह्मदेव बोलले.

दुःखी तारकांचें समूहगान—

परि दूर, अर्जुनिही दूर, विजय तो दूर तोंवरी कर्ण
करि कहर ओढुनि घनुष्य हें आकर्ण !
अुच्छिन्न, च्छिन्नविच्छिन्न, होअि अैन्द्रास्त्र, खिन्नही पार्थ,
तों कृष्णवैखरी शब्दांकित हो सार्थ

कृष्ण—

काय झालें अर्जुना, ही भ्रांत तूझ्या कां मनीं ?
अस्त्र तूझें केवि जाअी कर्णहस्तें भंगुनी !
लीलया राधेय रे संचरे हा संगरीं,
पांडवांची होय सेना कावरी अन् बावरी
श्रेष्ठ पांचालास आणी सोमकांच्या ह्या दळा
मृत्युपंथा धाडुनी हा कर्ण गर्जे आगळा !
सव्यसाचिन्, लोपली कां अस्त्रविद्या या पळा
बाण-संधानचातुर्या काय तूझ्या ही कळा !
घोर संहार! आक्रंदे जर्जरा सारी धरा,
सोड औदासीन्य पार्था ! धाड कर्णा यमपुरा !




अर्जुन—

देवकीनंदना हृदय भरे । त्वेषाने, क्रोधाने ! राधेयशरें–
नाराच, नालाकी, सुपुंख जलाल् । होती वाताहत माझे हे कराल
अमोघ अस्त्रांस भंगुनी सोडी । प्रत्यस्त्र टाकुनी राधेय फोडी !
स्फुरति हे बाहू अधीर अति । यदुवरा, परी, कुंठित मती !

कृष्ण—

सत्यसंधा ! ख्यातशौर्या ! जो त्रिखंडी तुल्य ना,
काय पार्थाची मती त्या कुंठ व्हावी पावना !
ज्या किरातें तुष्ट केलें बाहुयुद्धें अेकदा
आज निर्वीर्य व्हावें त्या अर्जुना, ही आपदा !
द्रौपदीतें क्लेश दिधले, पंढ बोले पांडवां,
कां अुपेक्षा योग्य आतां दुष्टबुद्धी कौरवां !
शत्रुसेना भीपणा ही अन् स्वसेना विस्मित,
पार्थ संमोहजालाने आज केली पीडित !

धैर्यवंता ! जो प्रतापें अर्पिला दे खांडव,
त्या न संदेह वाटावा कर्णशासनिंही लव
आठवावें स्वप्रभावा त्वां महाबाहो, अता
दिव्य आणावी यशाला कर्णनाशें सांगता !

**अर्जुन—**

केशवा, अलोट कृपेचे तुझ्या । सामर्थ्य बाहूंत युयुत्सु माझ्या
लोपला व्यामोह, संभ्रम सरे । अमोघ महास्त्र पवित्र त्वरें
स्मरुनि ब्रह्मयास, मंत्रीतो पहा । राधेयमस्तक दिशांस दहा
स्मरुनी ब्रह्मयास धाडितों पहा । राधेयमस्तक दिशांस दहा
राधेयमस्तक दिशांस दहा । वंदुनि शंकरा धाडितों पहा !

**सर्व तारकांचे समूहगान—**

प्रत्यंचेचा टणत्कार अन् ब्रह्मास्त्र सोडिलें
धनंजयाने जयनिर्धारें कर्णरथा रोखिलें.
आग मडकली वरती, खाली कौरवरक्तोदधी,
तरी न चळला महाप्रतापी वैकर्तन धीरधी !
पार्थशरांनी विद्ध जाहला रक्ताने माखला,
कर्ण लावितो निर्वाणीचा बाण धनुष्याला.
चंदनचूर्णी बाकदार शर सुवर्णभात्यांतुनी
नित्य पूजिला अखेर जोडी प्रत्यंचा छेडुनी !
पतन पावल्या अुल्का, झाले भीत्याकुल देवही !
आणि लहरली शांत हवेंतुन शल्याची वाणि हीः

**शल्य—**

रे, सावध राधेय, करी नीट विचार । व्हावें न अधीर
हा सर्पमुखी बाण नव्हे दारुण उग्र । अन् तीक्ष्ण विषाग्र
साशंक तरी पार्थ शिरच्छेदसमर्थ ? । आशाच निरर्थ !
पाडी न वृथा देव इरेला अविनाशी । होईल अपेशी
गेला न तुझा जीवरि हा बाण सुटोनी । घे नेम निदानीं
घे नेम पुन्हा आणि करीं सार्थ अचूक । संधानविवेक !

**कर्ण—**

शल्या, तुझी थोर गंभीर वाणी ! इषारा असो योग्य किंवा नसो !
वाटेल योद्धाधमें तो करावें ! सुखें बाणसंधान तें दोनदा !
अेकाहुनी अेक जाज्वल्य बाणा सुखेनैव सोडील शत्रूंवरी
कर्णास त्या मात्र ठावा न हा धर्म ! संधान त्याचें सदा अेकदा !!

**शल्य—**

कर्णा न तुवां मूल स्वतःचीच करावी । दुर्दैव प्रभावी !
सामान्य नसे बाण, नसे भाग्य दुवारा । वैकर्तनवीरा,
हा नागमुखी बाण नसे, नाग असे हा । संदेह नसावा

सुज्ञांस जसा काल तसें वर्तन इष्ट । अज्ञेय अरिष्ट
जाणून पुरें सर्व असा नेम धरावा । की व्यर्थ न जावा !

**कर्ण—**

मद्रेश ! तुझी वृथा भीति ! माझी नसे भिस्त अन्यांवरी संगरीं,
असो बाण किंवा असो नाग कोणी जरी पन्नगश्रेष्ठ पर्वा नसे !
यशाला न आशा दुजाऱ्या बलाची सहस्रावधी पार्थ आले तरी;
झाला टणत्कार, गेला पहा बाण, संधान माघार ना होतसे !!

**आनंदी तारकांचें समूहगान—**

सुटला बाण नि थिजली सृष्टी । चराचराची वळली दृष्टी,
रथास रोवी तो वनमाळी । पाय दाबुनी क्षणांत खाली;
मस्तक चुकलें, मुकुट उडाला । पार्थ सुरक्षित किरीट पडला
धन्य धनंजय ! धन्य सारथी ! आणि फुलांची झाली वृष्टी !

**सर्व तारकांचें समूहगान—**

कर्ण शराचा फांसा पडला उलटा, उलटा तसा
कालहि झाला आणि बोलला कर्णाप्रत संथसा:
"महाप्रतापी कर्णा, आली शेवटची वेळ ही
आणि चाललें चाक रथाचें महींत तव पाहीं."

**दुःखी तारकांचें समूहगान—**

रथचक्र, कर्णरथचक्र, दैवगति वक्र होउनी खोल
वघ रुतून बसलें, क्षणास या विनमोल !
अन् भ्रष्ट, कर्णमति भ्रष्ट, शापिता भ्रष्ट भार्गवास्त्राला
नाठवूं शके ही अघोर या वेळेला!
करि शर्थ रथोद्धारार्थ, कर्ण परि व्यर्थ, निघेना चाक
अन् विपण्ण जाओ राधेयाची हाक !

**कर्ण—**

पार्था ! क्षणैव स्थिरावें, पहावी रथाची स्थिती दीन भूमीगत,
अन् थांबवावें जरा युद्ध, द्यावा मला चाक हें उद्धराया क्षण !
तूं धर्मवीर प्रभावी ! मरावें, जगावें तसें धर्मयुद्धेन रे
शत्रू पडे संकटीं त्या वधावें, नसे वीरधर्मास हें योग्य रे!
भीती न तूझी न वा यादवाची, न याची दया कर्ण हा संगरीं;
येतां वरी चाक, सामर्थ्य आहे रणेच्छा कराया तुझी रे पुरी !

**सर्व तारकांचें समूहगान—**

कर्ण थांबला सुधीर, झाला अगतिकही भास्कर:
आणि भारतीं गीता वदली वाणी दे उत्तर—

कृष्ण—

आठवावा धर्म आतां हन्त ! कर्णाने रणीं !
घोर आश्चर्य, लावावें बुद्धिसामर्थ्या पणीं !
चंग बांधावा अधर्में फेडण्यातें संप्रती—
पांग धर्माचे, स्मरावें विस्मृतीनेही स्मृती !
श्रेष्ठ आदर्श व्हावें ना धर्मयुद्धाचा झणीं
पुण्यकीर्तीला स्मरूनी पाप कीर्तीपारणीं
अेकवस्त्रा द्रौपदीतें आणिली जैं ओढुनी
गर्जली कर्णाचि कां तैं वाणि धर्माची खनी !
कौरवांनी ठार केलें पार्थपुत्राला यदा
कां न धर्माचा स्मरावा सूतपुत्रा, वायदा ?
वेळ ये वैवस्वता अन् लोचनीं हे काजवे,
मान्य मोठें अंगराजा धर्म आता आठवे !
धार्तराष्ट्रा लावुं दिधलें पांडवा देशोधडीं
त्यास सौजन्य-मापाही शोभते का वावडी !
शाठ्य लाभावें शठाला, पार्थ कर्णाला तसा,
दोष द्यावा आज कोणीं आणि कोणाला कसा ?

कर्ण—

कृष्णा ! कळे भाव ! इच्छा तुझी जी प्रसंगीं अशा याहि व्हावें तसें !
यावे तुझे अर्जुना बाण, मीही रथीं वा रथावीण झुंजेन रे !

सर्व तारकांचें समूहगान—

आणि सोडिला शर कर्णानें अेक भयंकर नव
पार्थ कांपला थरथर गळलें हातांतुनि गांडिव;
क्षणांत परि तो सावध टाकी कर्णध्वज तोडुनी
आणि लावितो गांडीवाला आंजलिक प्रार्थुनी :

अर्जुन—

गांडीवा ! मंत्रुनी अस्त्रास महा । शरास लावितो प्रत्यंचीं पहा
देवास वंदन, गुरुचें स्मरण । करावें कर्णाच्या प्राणांचें हरण !

आनंदी तारकांचें समूहगान—

विजयाची पार्थ पताका । फडफडुनी कथिते ऐका
"कर्णदेह पडला खाली । कुंतिपुत्र हा यशशाली
ब्रह्मांडीं भरला शब्द । अेकच हा जयजयनाद"
दुमदुमलीं आनंदाने । स्वर्गधरा जयघोषाने !!

दुःखी तारकांचें समूहगान—

व्याकूल, श्रवणिं नच मूल, पवनिं चाहूल कुंतिमातेची,
हो तरल सांवली मुखरित जैंवि दगाची !

**कुंती—**

जाता सोडुनि आज अवचिता ॥ धृ० ॥
माता विव्हल, विव्हल कुंती
लाज न अश्रूंस मूक न प्रीती।
कर्णा! आशीस शोकच अंतीं
जातां सोडुनि आज

[ पडदा ]

**सर्व तारकांचें समूहगान—**

धर्मक्षेत्रीं कुरुक्षेत्रावर महाभारतीं रणीं
समाप्त झालें कर्णपर्व अन् भिजली ग पापणी!
अफाट गगनीं उदासवाणी भिरभिरते साजणी,
रिती भावना अता अेकली ही केविलवाणी!
गहिंवरते ती हताश कोणी मानव बघतां गुणी,
आणि सांगते कर्णकहाणी हसून वेडेपणीं:
"कृष्णमुखाने देव आठवे कर्णाची पेरणी,
कापट्याची दुष्कृत्याची जेव्हां समरांगणीं,
निजला भार्गव, कर्णमांडिची केली पोखरणी
कीटमुखाने देवेंद्राने आली का स्मरणी!
कापट्याने ब्राह्मणवेषें इंद्र करी मागणी,
सूर्यकुंडलें देअुनि झाला कर्ण यमाचा ऋणी!
अुपहासाने अुजळित असतां कर्णाची करणी,
मात्र विसरली भीष्मवधाला पवित्र ती वाणी!!
दैव अुलटतां देवहि अुलटे! अंधकरी वारुणी–
सर्वशक्तिची, पुण्य हरपुनी पापच ये अीक्षणीं!
शौर्य न पुरतें, धैर्य न पुरतें, औदार्य न कारणीं,
तदा मानवा! कर्णकहाणी स्मरुनि पडावें रणीं!!"
निळ्या नभांतुन रिती भावना भिरभिरतां साजणी,
अशाच साऱ्या सूर मिळवितों आम्ही तारांगणीं!*

---

(* ऑ. अिं. रेडिओ, मुंबअी, यांच्या कृपेने.)

# मराठी-ऑस्ट्रिक शब्दसाम्यें

(श्री. कृ. पां. कुलकर्णी)

१. मराठी ही विद्यमान बोलभाषा असल्यामुळे व गेलीं हजार बाराशें वर्षे त्याच अवस्थेंत ती असल्यामुळे तिच्यांत शब्दांची येरजार सारखी चालली आहे. जुने शब्द आले, कांही काळ वापरांत राहिले, पुढे त्यांचीं रूपान्तरें झालीं व कांही अवशिष्ट भाग मागे ठेवून ते नाहीसे झाले. जे नवे शब्द येत आहेत त्यांचीहि पण तीच अवस्था होणार हें उघड आहे. भाषेच्या जीवनांतील नियमांप्रमाणेच हें होत आहे. मराठीच्या हजारबाराशें वर्षांच्या जीवनांत तिचा निरनिराळ्या भाषांशीं संबंध आला व त्याचा परिणाम शब्दांच्या देवाणघेवाणांत झाला. मराठी ज्या निरनिराळ्या– संस्कृत-प्राकृत भाषांच्या– अवशेषांतून उद्भूत झाली त्या भाषांतील शब्दांच्या देवाणघेवाणीचा परिणाम तिच्यावर झाला. तो परिणाम तसाच पुढे चालू राहणार हें उघड आहे. संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश ह्या भाषांचाहि दुसऱ्या परकी भाषांशीं संबंध आलाच असला पाहिजे. त्यांच्यांतील कांही परकी शब्द संस्कृत-प्राकृत भाषांत आलेले असले पाहिजेत व ते शब्द मराठीमध्ये वारसाच्या हक्काने उतरले असले पाहिजेत. तेव्हा मराठींतील शब्द-संपत्ति तपासतांना तिच्या हजार बाराशें वर्षांचीच तेवढी हयात तपासून भागणार नाही. तिच्या जन्माच्या पूर्वी तिला जन्म देणाऱ्या भाषांचीहि हयात आपणांस तपासावी लागेल व त्यांतील परकी अवशेष हुडकून काढावे लागतील. ह्या दृष्टीने संस्कृत-प्राकृत भाषांतील परकी शब्द, की जे शब्द मराठी भाषेंत तत्सम किंवा तद्भव रूपांत उतरले ते, अगोदर पाहिले पाहिजेत. परकी ऋणापैकी हें ऋण कालदृष्ट्या अर्थात् पहिलें होय.

२. आंग्ल भाषेचें ऋण आपण गेल्या तीनशें वर्षांच्या सहवासाने कांही थोडें घेत आहोंत. त्याच्या पूर्वी किंवा त्याच कालांत पोर्तुगीज, फ्रेंच, डच वगैरे भाषांतील कांही थोडे शब्द आपल्या मराठी भाषेंत आले. त्याच्याहि पूर्वी म्हणजे गेलीं सातआठशें वर्षे आमचा आणि महमदीयांचा संबंध आल्यामुळे त्यांच्या अरबी व फारशी ह्या भाषांतील शब्द मराठी भाषेंत आले. ह्या परकी शब्दांची येरजार फार बेसुमार आणि व्यवहाराच्या सर्व क्षेत्रांत झाली. ती अितकी विकोपास गेली की कित्येक वेळां त्याला विरोध करावा लागला. अरबी-फारशी भाषांच्या संबंधाच्या पूर्वी कानडी, तेलगू वगैरे द्राविड भाषांचा आणि मराठी भाषेचा संबंध आल्यामुळे पुष्कळ द्राविडी शब्द मराठींत आले. अरबी-फारशी शब्द बहामनी सुलतानांच्या राजवटींत आले तर चालुक्य, राष्ट्रकूट व वाकाटक ह्या राजवटींच्या अमदानींत कानडी शब्द आले. अितकेंच नाही तर पुढेहि यादवकाल, बहामनीकाल व शिवकाल ह्या कालांतहि परस्पराचें राजनैतिक दळणवळण फार झाल्यामुळे द्राविडी शब्द मराठींत येतच राहिले. ह्या द्राविडी भाषिक ऋणाचें मूळ फार प्राचीन आहे. तें थेट वैदिक कालापर्यंत जातें असें म्हणावयास हरकत नाही.

३. आपण ज्या शब्दऋणाचा विचार करणार आहों तें ह्याच्याहि मागे जातें. हें शब्दाचें ऋण ऑस्ट्रिक भाषांतील आहे. ह्या भाषांचा अेक मोटा संघ किंवा वंश आहे. ह्या भाषा म्हणजे आर्यांचा प्रवेश मध्यदेशांत होण्याच्या पूर्वी तेथे जे अेतद्देशीय लोक राहत होते

अनुक्रमणिका

त्यांच्या होत. आर्यांच्या रेट्यामुळे ते लोक पूर्वेकडे लोटले गेले. त्यांच्यापैकी कांही बंगाल-आसामच्या डोंगरखोऱ्यांत, कोणी राजमहेंद्रीच्या किंवा मणीपूरच्या आसपास डोंगरकपाऱ्यांत राहून वसले. कोणी अधिक पूर्वेकडे व दक्षिणेकडे खेचले जाऊन अनाम, पेनांग, जावा, सुमात्रा, मलाया द्वीपकल्प, निकोबार बेट ह्या ठिकाणीं राहिले. ह्या अेतद्देशीय लोकांचा आणि आर्यांचा संबंध आला व त्यामुळे भाषिक देवघेव पुष्कळ झाली. तिचे स्पष्ट अवशेष संस्कृतच्या निरनिराळ्या थरांत दिसतात. वैदिक संस्कृत, ग्रांथिक संस्कृत, लौकिक संस्कृत, प्राकृत व अर्वाचीन बोली ह्या भाषांतील तत्सम व तद्भव ह्या दोहोंत किंवा दोहोंपैकी अेका स्वरूपांत त्या जुन्या शब्दांचे अवशेष आढळून येतात. ऋग्वेदामध्ये जर्फरी, तुर्फरी, बृबु, बुसथ, तावुव, तितअु अित्यादि अनार्य शब्द आढळतात. राका व सिनीवाली ह्या देवतानांवांबद्दलहि शंका आहे. ज्योतिषशास्त्रांत व अथर्ववेदांत कांही पारिभाषिक शब्द परकीय असलेले दिसतात. होरा, द्रेष्काण, नेम, तामरस, पिक, तक्म हे शब्द जरी वैदिक वाङ्मयांत वापरले असले तरी ते मूळचे म्लेच्छ असल्याची ग्वाही जैमिनीने दिली आहे. ह्याशिवाय कर्मार, कितव, कला, काल, कूट, कुणास, गण, कुंड, नाना, नीहार, नील, हिममेघ, निश, नीज, मयूर, रात्री, रूप, सायम्, वस्तु हे परकी शब्द वेदांत आढळतात. ब्राह्मणग्रंथांतहि अटवि, आल्क, आडंबर, कम्बल, कुलाल, खड्ग, तंडुल, तिल, पण, मटची, मर्कट, बरक्ष (पांढरा), वल्ली, व्रीहि, शव हे शब्द परकी आहेत. दोन संस्कृतींचा संबंध आला की असे परकी शब्द यावयाचेच. हें लोण टाळतां येणें शक्य नाही. सध्या ज्याप्रमाणे परकी शब्दांबद्दल व्यामोह अुत्पन्न झाला आहे, व त्याच्या अव्याहत वापराने कपाळाची तिडीक अुठून ते खच्चून:मारले बाहेर फेकून देण्याकडे प्रवृत्ति झाली आहे, त्याप्रमाणे पूर्वीच्या काळांतहि तसा व्यामोह अुत्पन्न झाला होता. त्या वेळीं पूर्वसूरि कसे वागले हें पाहिलें म्हणजे त्यापासून आपणांस मार्गदर्शन होणार आहे. जैमिनीच्या न्यायमालेंत ह्या व्यामोहाचा विचार पहिल्या अध्यायाच्या अधिकरणांत केला आहे. त्या अधिकरणाचें नांवहि आर्यम्लेच्छ अधिकरण असें दिलें आहे (जैमि. न्यायमाला १–१).

४. अशा रीतीने कित्येक परकी शब्द प्राचीन संस्कृत वाङ्मयाच्या खबरदारींत किंवा सांदीकोपऱ्यांत सुरक्षित रीतीने दबा धरून बसले व भोवतालच्या संस्कृत वातावरणांत अितके अेकरूप झाले की त्यांच्या परकेपणाचा ठसा पार नाहीसा झाला व अितक्या दिवसांच्या वापराने ते संस्कृतच बनले. हे शब्द अनार्य होत, आर्य नव्हत, अितकें जरी ठरलें तरी तेवढ्याने भागत नाही. त्यांना नुसते अनार्य म्हणून त्या प्रश्नाचा निकाल लागत नाही. अनार्य खरे पण कोणत्या विशिष्ट भाषेंतील ते शब्द आहेत हें पाहणें जरूर आहे. त्यांना अनार्य म्हणतात; त्यांना द्राविडी म्हणतात; त्यांना देशी म्हणतात; असें कांही जरी म्हटलें तरी तो स्थूल निर्देश आहे; सूक्ष्म व चिकित्सक नव्हे. हे शब्द आर्यांच्या हिंदुस्तानांत झालेल्या वसाहतीपूर्वी जे लोक येथे राहत होते त्यांच्या भाषेंतील आहेत हें जसें शक्य आहे तसें ते द्राविडी लोकांच्या वसाहतीपूर्वी जे लोक येथे राहत होते त्यांच्या भाषांतील असणेंहि तितकेंच शक्य आहे. हे जसे आर्यपूर्वकालीन शब्द आहेत तसे ते द्राविडपूर्वकालीनहि आहेत; म्हणूनच ह्या शब्दांना सिल्वा लेव्हीने आर्यपूर्व आणि द्राविडपूर्व असें अुभयविध नांव दिलें आहे.[१] हें नामकरणहि सामान्य स्वरूपाचें झालें. ह्यातहि त्यांच्या मुळाचा थांग लागला नाही. अेका अनार्य नांवा-

१. Sylvain Lévy, Pre-Arya and Pre-Dravidian, P. 64.

अैवजी आर्यपूर्व आणि द्राविडपूर्व असें जोडनांव आलें अितकेंच. ह्या परकी शब्दांचा नक्की थांग लावण्यासाठीं ह्याच्याहि मागे जाणें जरूर आहे; आणि त्यासाठीं अनार्य भाषा अधिक तपासल्या पाहिजेत. अनार्य भाषा अर्थात् अनार्य लोकच बोलत होते. हे अनार्य लोक म्हटले म्हणजे भिल्ल, कोंड, काथोडे, कातकरी हे अिकडील, व संताळी, बैगा, मणिपुरी कोंड वगैरे अुत्तरेकडील. हे लोक आर्यांच्या आक्रमणाच्या रेट्यामुळे पूर्वेकडे अधिक अधिक खेचले गेले. पूर्वेकडील द्वीपकल्प, मलाया, जवा, सुमात्रा, निकोबार, अनाम, पेनांग वगैरे भागांत डोंगर-खबदाडींत सध्या राहत असलेले रानटी लोक हेच त्यांचे वंशज असले पाहिजेत. ह्या लोकांच्या भाषा जर तपासल्या तर संस्कृतमधील अनार्य म्हणून समजल्या गेलेल्या बऱ्याच शब्दांचा बरोबर थांग लागण्याचा संभव आहे.

५. येथे अेक गोष्ट सांगणें अवश्य आहे; नाही तर गैरसमज होण्याचा संभव आहे. ही शब्दांच्या मूळांची विचिकित्सा आहे. ह्या विचिकित्सेंतील धागे फार सूक्ष्म आहेत. हे सूक्ष्म धागेदोरे सांगतांना कांही ठिकाणीं असंभवनीयता, कांही ठिकाणीं हटात् व्युत्पत्ति, कांही ठिकाणीं ओढूनताणून आणलेलें साम्य वगैरे वाटण्याचा संभव आहे. कांही ठिकाणीं चर्चा मनोरंजकच केवळ नव्हे तर हास्यकारकहि वाटेल. परंतु सर्व विचिकित्सा साधार, सनियम व सशास्त्र अशी आहे. तर्काला किंवा अनुमानाला फारसा वाव दिला नाही असें युरोपीय पंडितांचें सांगणें आहे. अितकें जरी आहे तरी आम्ही आमची भूमिका त्यांच्यापेक्षाहि अधिक मर्यादित करूं अिच्छितों. आम्ही जे शब्द दाखविणार आहोंत ते सर्व त्याच अनार्य भाषांतून आर्य भाषेने— संस्कृतने— घेतले असें आमचें म्हणणें नाही; ते शब्द आर्य भाषेंतूनहि अनार्य भाषांनी घेतले असणें शक्य आहे. प्राचीन काळीं संस्कृत ज्ञानाचा पुनरुद्धार तीन कालखंडांत झाला त्या वेळीं कदाचित् ह्या अनार्य शब्दांचें संस्कृतीकरण करून त्यांचा संस्कृत कोशांत अंतर्भाव केला असला पाहिजे. महाभारताच्या संस्कृतीकरणाचा काल, गुप्त राजवटींचा किंवा अष्टादश पुराणलेखनाचा काल, हेमचंद्रसूरीचा काल असे हे संस्कृत ज्ञानाच्या पुनरुद्धाराचे तीन कालखंड होत. ह्यांपैकी कोणत्या तरी कालखंडांत त्या अनार्य शब्दांना संस्कृतमध्ये प्रवेश मिळाला असण्याचा संभव आहे. पुढील दोन्ही अुपपत्ति संभवनीय आहेत : संस्कृतने त्या भाषांतून हे शब्द घेतले, किंवा त्या भाषांनी हे शब्द संस्कृतमधून घेतले. ह्या दोन्ही भाषांतील शब्दांत आढळून येणारीं अुत्तान साम्यें जरी मान्य झालीं तरी पुष्कळ साधलें. आमच्या ह्या लेखांत दिलेल्या संस्कृत व ऑस्ट्रिक ह्या भाषांतील शब्दांच्या रूपांतील साम्येंच म्हणून पाहावींत. हीं साम्यें जीं शोधतां आलीं तीं युरोपीय पंडितांनी त्या अनार्य— ऑस्ट्रिक भाषांचा जो अभ्यास सूक्ष्म रीतीने केला त्यामुळेच.

६. ह्या भाषांसंबंधी संशोधन साधारणपणें अि. स. १८८० च्या कांही अगोदर सुरू झालें. लोगन ह्या संशोधकाने 'मॉन अनाम' ह्या नांवाच्या सर्व भाषांतील साम्य शोधून काढलें. पुढे कीन (१८८०), फोर्ब्स (१८८१) ह्यांनी त्या विधानाला पुष्टि दिली. मुल्लरने त्यांचाच अभ्यास पुढे चालविला. कून्ह ह्या संशोधकाने अनामी भाषांचा आणि मॉन् ख्मेर, खासी, आणि मलाक्का येथील बोलभाषांचा संबंध स्पष्ट करून दाखविला. कून्हचे संशोधनकार्य श्मिड ह्याने मोठ्या नेटाने व मोठ्या सूक्ष्मत्वाने पुढे चालविलें. त्याने त्या भाषासंबंधाचें क्षेत्र अधिक विस्तृत केलें. मॉन अनाम, मॉन ख्मेर, खासी, मलाक्का ह्या सर्व भाषांचे आणि मलाया द्वीपकल्पांतील भाषांचे संबंध असून त्या सर्व भाषा एकाच भाषावंशांतील होत असें त्याने सिद्ध केलें. ह्या सर्व भाषासंशोधकांत श्मिड् (Schmidt) ह्याचें नांव विशेष महत्त्वाचें आहे. त्याने शब्दसंग्रह

तपासला, त्यानें स्वरप्रक्रिया तपासली. त्याने निकोबार बेटावरील भाषेशीं साम्यहि दाखविलें. त्याच्यानंतर ग्रियर्सन आणि स्टेन कोनौ ह्यांनीहि त्याबाबत आपल्या संशोधनाची भर घातली. ह्या भाषांच्यासंबंधीं संशोधन करणाऱ्यांमध्ये आणखी तीन व्यक्ति विशेष अुल्लेखनीय होत. प्रसिद्ध पंडित सिल्वॉं लेव्ही व जूल ब्लोक हे दोघे फ्रेंच व एक पोलिश पंडित जीन प्रिझलुस्की ह्यांनी ऑस्ट्रिक भाषासंबंधी संशोधन केलें आहे. आपल्या अिकडील ज्या संशोधकांचें ह्या भाषांकडे लक्ष गेलें ते म्हणजे अेक प्रबोधचंद्र बागची व दुसरे सुनीतिकुमार चतर्जी हे होत. ह्या सर्व संशोधकांत श्मिड हा आद्य व मुख्य संशोधक होय. मॉन अनाम, मॉन ख्मेर, खासी, निकोबारी, मुण्डा व संताळीचा कांही भाग ह्या सर्व भाषांचा अेक संघ किंवा वंश समजून त्याला त्याने "ऑस्ट्रो अेशियाटिक" असें नांव दिलें. ह्या भाषावंशाला मेलेनीशिया, पॉलिनेशिया, अिंडोनेशिया येथील भाषा जोडल्या म्हणजे ह्या अनार्य भाषांचा "ऑस्ट्रिक वंश" तयार होतो[२].

७. मलाया द्वीपकल्पांतील भाषा हा अेक मोठा कुतूहलाचा विषयच आहे. अेक तर त्या सर्व भाषा अद्याप बोलींच्या स्वरूपांत आहेत. त्यांपैकी कोणतीहि ग्रंथनिविष्ट अद्याप झालेली नाही. आणि दुसरें म्हणजे त्या सर्वांचें क्षेत्र फार संकुचित आहे. कांही तर अेक अेका कुटुंबापुरत्याच आहेत. त्यामुळे त्यांची अेकंदर अवस्था कांही चांगली नाही. अधोगतीस लागून नाहीशा होण्याचीहि कांही भाषांच्या बाबतींत भीति आहे. त्यांतल्या त्यांत मलायी भाषा सर्वांत अग्रेसर आहे. अितर भाषांवर कांही आक्रमण होतें तें ह्या मलायी भाषेकडूनच. आणि हें असेंच जर चाललें तर अितर कुटुंबी भाषा नाहीशा होअून मलायी भाषाच सर्व क्षेत्र व्यापून बसेल. मलायी भाषा सांस्कृतिक समजली जाते, व त्यामुळे ती भाषा बोलण्याकडे लोकांचा विशेष कल आहे.

८. ह्या भाषांचें वर्गीकरण जें केलें आहे तें बऱ्याच अंशीं बोलणाऱ्या लोकांच्या जातींना किंवा वंशांना अनुलक्षून केलें आहे. स्थूल मानाने वर्गीकरण पुढीलप्रमाणे आहे. द्वीपकल्पाच्या अुत्तरेच्या भागांत सेमांग (Semang) बोली बोलल्या जातात. मध्यभागांत सकाअी (Sakai) आणि दक्षिणभागांत जाकुन (Jakun) बोली बोलल्या जातात. ह्या तीन बोलींचे पोटभेद पुष्कळच आहेत. **सेमांग**मध्ये केदा (Kedah), पंगन (Pangan), प्लुस (Plus), दक्षिण सेमांग हे भेद आहेत. सकाअी भाषेचे पुनः अुत्तर, मध्य, दक्षिण सकाअी असे तीन मुख्य पोटभेद आहेत. बेसिसी, बेदुन्द, सर्टीन, बेरा, अुलुदंदाअु हे पुनः आणखी पोटभेद आहेत. त्याप्रमाणे जकूनचे पोटभेद बेलान्द, बेदुन्द, मैंत्र हे आहेत. केनबोअी ही अेक स्वतंत्रच भाषा आहे. ह्याशिवाय ज्या भाषा किंवा जे पोटभेद वरील कोणत्याहि वर्गांत बसूं शकत नाहीत अशा कितीतरी भाषा आहेत. अेकट्या सेमांग भाषेचे कांही तरी पसतीस पोटभेद आहेत. तीच गोष्ट थोड्या फार फरकाने सकाअी व जाकून भाषांची. मलाया द्वीपकल्पातील भाषांचा पसारा हा अशा प्रकारचा आहे. ह्या सर्वांचा अभ्यास किती कष्टाचा असेल! ह्या भाषांतील शब्दांचा अेक तौलनिक स्वरूपाचा संग्रह स्कीट आणि ब्लॅग्डेन (१९०६) ह्यांनी आपल्या ग्रंथाच्या शेवटीं दिला आहे. क्रॉफर्ड (१८५६) ह्यानेहि मलायांतील भाषांचा अेक कोश लिहिला आहे. ह्या कोशांच्या साहाय्यानेच तौलनिक अभ्यास शक्य केला. ह्यांतील वरील पहिल्या कोशांत त्या त्या शब्दांचीं सर्व पोटभाषांतील स्वरूपें दिल्यामुळे तर तो कोश फार

२. P. Schmidt's article translated. Intro. Pro. A, Pre. D. P. 1.

३. Skeat and Blagden : Pagan Races of Malaya Peninsula, Vol.II, pp.409-411.

मजेदार झाला आहे. ह्या कोशांचा अुपयोग प्रस्तुत निबंधांत केला आहे. त्या दोन्ही कोशांत संस्कृत रूपें अर्थातच दिलीं नाहीत. जीं आम्ही प्रिझलुस्की, लेव्ही, ब्लोक, बागची व चतर्जी ह्यांच्या लेखनांतून घेतलीं आहेत त्यांच्याबाबत तेथे तेथे आधार दिले आहेत. बाकीचीं आम्हीं शोधून काढलीं आहेत. विद्वानांच्या विचारासाठी आम्ही तीं सर्व पुढे क्रमाने मांडीत आहोंत. प्रथम नऊ परिच्छेदांत कांही शब्द सविस्तर विवेचिले आहेत. त्याच्यानंतर अकारविल्हेने शब्द मांडून थोडक्यांत त्यासंबंधी विवेचन केलें आहे. शब्दांच्या पुढे कंसांत अिंग्रजी अक्षरापुढे आंकडे दिले आहेत ते स्कीट आणि ब्लॅगडेन यांच्या कोशातील आहेत.

## १ अूंस

९. मराठींतील 'अूंस' हा शब्द परकी असेल अशी कल्पनाहि येत नाही. परंतु तो तसा आहे. संस्कृत शब्द **अिक्षुदण्ड** असा आहे. त्याचें प्राकृत रूप **अुच्छु** असें आहे. त्यापासून मराठी शब्द 'अूंस' हा झाला असें पारंपरिक व्युत्पादक सांगतात. परंतु तें सयुक्तिक दिसत नाही. '**इक्षुदण्ड**' हा सामासिक शब्द आहे. इंग्रजी भाषेंत Sugar-cane असा सामासिक शब्दच रूढ आहे. सामासिक शब्द तयार करण्याची जरूरी भासणें ह्याचा अर्थच हा की मूळ कल्पनेचा योग्य दर्शक असा शब्द त्या भाषेंत नाही. तेव्हा संस्कृतमध्ये मूळ जर शब्द नाही तर तो दुसऱ्या कोणत्या तरी भाषेमधून संस्कृतमध्ये आला असला पाहिजे. आर्य लोकांना 'अूंस' ही काय चीज आहे हें माहीत नव्हतें; म्हणून त्यांच्या भाषेंत तद्दर्शक शब्द नव्हता. ह्यावरून असें अनुमान करावयास हवें की आर्यांच्या अभिनिष्क्रमणांत त्यांचा जेव्हा दुसऱ्या लोकांशीं व देशांशीं परिचय झाला तेव्हा हा नवीन पदार्थ व तद्दर्शक शब्द यांच्याशींहि त्यांचा परिचय झाला. हे परकी देश व लोक कोणते ? हे लोक अुत्तरेकडील असले पाहिजेत व मध्यदेशाच्या पूर्वेकडील असले पाहिजेत हें अुघड आहे. असे लोक म्हटले म्हणजे **मंगोलियनच** होत. तिबेत, ब्रह्मदेश किंवा हिमालयाचा दक्षिण परिसर ह्या प्रदेशांत राहणारे हे लोक होत. ह्यांच्या भाषा **चिनी** भाषेशीं संबद्ध आहेत. चिनी भाषेंत **अुंसाचे** वाचक पुढील **chay, choo, sen, choo** हे शब्द रूढ आहेत. हे सर्व शब्द अेकाच मूळ शब्दाचे पर्याय दिसतात, व ते प्राकृत '**अुच्छु**' ह्या शब्दाच्या जवळचे दिसतात. **अिक्षु** हा शब्द **अुच्छु** चें संस्कृतीकरण दिसतें.

ह्याच दृष्टीने कांही ऑस्ट्रिक शब्दहि ताडून पाहण्यासारखे आहेत. निरनिराळ्या ऑस्ट्रिक भाषांतील 'अूंस'वाचक कांही शब्द रोमन लिपींत मांडून दाखवितों. पहिला शब्द भाषेचें नांव असून दुसरा शब्द 'अूंस'वाचक आहे. Kena – *Sau*; Serting – *Bos*; Bes. k – *Boho, bois*; Bes. Sep. – *Boys, Bāys, bas;* Sak. ra – *Bush, Buus, Būs*; Tembi – *Buush, Buus*; Ben. new. – *Buh*; Khmer – *Abau*.[४]*

'अूंस' हा पदार्थ जरी मंगोलियन चिनी लोकांच्या परिचयाचा असला तरी त्यापासून निर्माण होणारा **साखर** हा पदार्थ त्यांच्या परिचयाचा नव्हता. **साखर** तयार करण्याची कला त्यांना अवगत नव्हती. तितके ते सुधारलेले नव्हते. मलायी व जावानी लोक हे त्यांच्यापेक्षा कृषिशास्त्रांत अधिक प्रगत होते. त्यांच्या भाषेंत *Gula*, *Sakara*, *Kara* हे शब्द **गूळ व साखर** ह्यांचे द्योतक हे आहेत. ह्या जावानी शब्दांपासून संस्कृत– **गुड**, **शर्करा**; अरबी– *Sākar* व अिंग्रजी– *Sugar* ह्या शब्दांचा जन्म झाला. **गूळ** किंवा

४. Skeat and Blagden, Dict. S 513.

**साखर** हे पदार्थ ऊंसापासूनच केवळ तयार करीत असेंहि नाही. ताडाच्या झाडाच्या चिका-पासून **गूळ** तयार करण्याची प्रथा फार प्राचीन काळापासून त्या लोकांना अवगत होती. ऊंसापासून ते जिन्नस तयार करण्याची कला ही ऊत्तरकालीन होय.

साखरेचे पुनः दोन प्रकार असत. ऐक वाळूसारखी कणयुक्त व दुसरी दगडासारखी खण्डयुक्त. ह्यांना अनुक्रमें **चिनी** आणि **मिश्री** अशीं दोन नांवें आहेत. साखर तयार कर-णारे प्रथमचे लोक म्हटले म्हणजे जावानी. त्यांच्यापासून चिनी लोकांनी ही कला उचलली व चिन्यांपासून हिंदी लोकांनी ऊचलली. ग्रीक लोकांना ही कला पौर्वात्यांपासून अवगत झाली.

## २ तांबूल, तांबोळी

१०. मराठी तांबोळी हा शब्द तद्भव आहे. त्याचें मूळ सं. तांबूल हें आहे. तांबूल-करंडवाहिनी हा शब्द बाणाच्या कादंबरींत आहे. म्हणजे सातव्या शतकांत ग्रांथिक संस्कृतमध्ये हा रूढ होता. ह्या **तांबूल** शब्दाचें मूळ ऑस्ट्रिक आहे. ह्या शब्दाचीं संस्कृत, पाली व प्राकृत रूपें अनुक्रमें तांबूलम्, ताम्बूली, ताम्बूलम्, ताम्बोलम्, ताम्बोलि अशीं आहेत. ह्या शब्दांत दोन अवयव स्पष्ट आहेत. पहिला अवयव **तम्** किंवा **ताम्** व दुसरा अवयव **बूल** किंवा **बोल**. हे दोन्ही अवयव ऑस्ट्रिक शब्दांशीं ताडून पाहण्यासारखे आहेत. ऑस्ट्रिक भाषेंत **मलू** किंवा **बलू** हा ऐक वनस्पतिअर्थक शब्द आहे. ती वनस्पति नागवल्लीसारखी आहे. तिच्या पानांच्या वळया करून त्यांत दुसरें कांही साहित्य घालून तीं विड्यासारखीं खातात. ह्या **मलू** किंवा **बलू** शब्दाची निरनिराळ्या ऑस्ट्रिक भाषांत **बलु** (अलक भाषा), **म्लुव** (ख्मेर), **बोलोअु** (बाह्नार), **मलुअ** (सूअि), **मेलु** (लवे), **म्लू** (स्टींग), **ब्लू** (खासी), **प्लू** (पलौंग) अशीं रूपें होतात. तेव्हा **ताम्बूलमधील बूल** ह्या अवयवाचा ह्या वरील सर्व शब्दांशीं ऊच्चारदृष्ट्या व अर्थदृष्ट्या संबंध दिसतो. आता राहिला पहिला अवयव **ताम्** हा. ऑस्ट्रिक भाषेंत **क** आणि **त** असे दोन पूर्वसर्ग (Prefix) शब्द आहेत. ते झाडांच्या व जनावरांच्या नांवाच्या मागे लागतात. आणि ते लागतांना त्यांच्यामध्ये ऐक अनुनासिक येतें. तेव्हा ह्याचीं रूपें कोम्, तोम्, डोम् अशीं निरनिराळीं रूपें होतात. **तोम्** आणि **बूल** किंवा **बोल** हे दोन अवयव मिळून **तोम्बूल**, **तोम्बोल** असे शब्द बनले. आणि हेंच आपल्या संस्कृत **ताम्बूलचें** किंवा मराठी **तांबूल**, **तांबोळी** ह्या शब्दांचें मूळ होय. तेव्हा ताम्बूल, तांबोळी हे शब्द ऑस्ट्रिक आहेत. विडा खाण्याची प्रथा मूळ आर्यांत नव्हती. पाश्चिमात्य आर्यांत सध्या नाही. आपणामध्येहि प्राचीन काळीं प्रथम नव्हती. ती ऊत्तरकालीन आहे व ती मलायी लोकांपासून घेतली.[५]

## ३ बाण

११. **'बाण'** हा शब्द संस्कृत आहे. शब्द फार जुना आहे. तो वेदांत (६-७५-१७) आढळतो. त्यावरून आर्य लोकांना 'बाण' तयार करण्याची व मारण्याची कला माहीत होती. परंतु बांबूचा बाण तयार करण्याची कला हिंदुस्थानांत आल्यानंतर ऐतद्देशीयांकडून शिकली असण्याचा संभव आहे. संस्कृत **बाण** शब्द आणि ऑस्ट्रिक **पनः**, **पोनह**, **फ्नोहः**, **म्रोह** हे शब्द, ह्यांचें साम्य– ऊच्चाराचें व अर्थाचें- दिसतें. ह्या ऑस्ट्रिक शब्दांतील मूळ धातु **पोह**, **पह्**, **म्राह्** असे आहेत व त्यांचे अर्थ मनुष्याने दगड मारणें, फेकणें, कापसांतील सरक्या फेकणें, पिंजणें असे आहेत. तेव्हा ऑस्ट्रिक पनह्, पोनह्, फ्नोह, म्रोह ह्या शब्दापासून

५. Prizuluski Pro-Aryan and Pro-Dravidian P. 15-1.

**बाण** शब्द संस्कृतमध्ये आला असावा.[६] **पिंजणें** हा मराठी धातु ह्या वरील धातूंशीं संबद्ध असावा काय ? तसेंच **गोफण** हा मराठी शब्दहि संबद्ध असावा काय अशी शंका येते. हा संबंध दिसावयास जरा दूरान्वयाचा दिसेल असें आम्हांस वाटतें. स्टीअेङ्ग भार्षेत **अक्** असा अेक शब्द आहे, व त्याचा अर्थ कापूस पिंजण्याचें साधन, किंवा धनुष्य, बाण असा आहे. वरील **पनह, पोनह, फनोह, म्रोह** हे शब्द आणि हा **अक्** शब्द मिळून जो शब्द होअील तो संस्कृत **पिनाक** ह्या शब्दाच्या जवळ येअील. तेव्हा **पिनाक** ह्याचा संबंध ऑस्ट्रिक शब्दाशीं असावा असें चतर्जी ह्यांनी अनुमानलें आहे.[७] मलाया भार्षेत अनाक असा शब्द आहे. ह्या शब्दाचा आणि संस्कृत **कार्पास, कार्पासपट** किंवा मराठी **कापूस** व **कापड** ह्या शब्दांशीं संबंध कसा आहे हें पाहणें अत्यंत मनोरंजक आहे.

### ४ कार्पास, कापूस, कापड

१२. वर दिलेल्या **बाण** अर्थक ऑस्ट्रिक शब्दांत **पह्, पोह्, बोह्** हा धातु आहे. ऑस्ट्रिक भाषांत अन्त्य **ह्** हा मूळ **स्**पासून अुद्भूत होतो. ख्मेर भार्षेत **अम्बोह्** व **अम्बोस्** असे दोन शब्द आहेत व त्यांचा अर्थ **कापूस** असा आहे. अितर ऑस्ट्रिक भाषांत **'कापूस'** ह्या अर्थी पुढील शब्द आहेत.

**कोपैह्** (बहनार), **कोपे** (सेदांग), **कवस्** (कुओअी), **कोपस, कपस** (रदे), **कपस** (मलायी व जावानी), **ह्पस** (बटक), **कपह्.**

ह्या सर्व शब्दांच्या मुळाशीं **वस्** हाच धातु आहे. ख्मेर शब्दांत जो अनुनासिक आला आहे तो त्या भाषेचा विशेष आहे. **क** व **को** ह्या पूर्वसर्गांच्या पुढे अेक अनुनासिक येतो. अितर भाषांत तो आला नाही. मराठी **कापूस** ह्या शब्दाशीं वरील ऑस्ट्रिक शब्द किती जवळचे आहेत ! दोन्ही शब्दांत कांही तरी जवळचा संबंध असला पाहिजे.[८]

कार्पास ह्या शब्दांत **कार** व **पास** असे दोन अवयव आहेत. पैकी **पास** ह्याचा **वास्, वस** ह्या धातूशीं संबंध आहे. संस्कृतमध्ये **पट** आणि **कर्पट** असे दोन शब्द **कापड** ह्या अर्थी आहेत. **पट** ह्याचा जो अर्थ तोच **कर्पट** ह्याचा. त्यावरून **कर** हा पूर्वसर्ग ठरतो व तसा तो ऑस्ट्रिक भाषांत आहेहि. आता राहिला **'ट'**. **कार्पास**मध्ये अन्त्य **स** असून **कर्पट**मध्ये अन्त्य **ट** कसा आला ? ह्याचें अुत्तर हें की मॉन् ख्मेर भार्षेत **स्** आणि **ट्** (**त्**) ह्या वर्णांची अदलाबदल होते; आर्य भाषांत होत नाही; परंतु ऑस्ट्रिक भाषांत होते. **'केस'** ह्या अर्थी जे पुढील शब्द आहेत त्यांमध्ये ही अदलाबदल झालेली दिसेल : **सोक** (मॉन्), **सॉक** (ख्मेर), **सोक** (स्टीअेङ्ग), **तोक** (अन्नामाअिट). तेव्हा **कार्पास, कर्पट, पट** व मराठी **कापूस, कापड** हे शब्द ऑस्ट्रिक असले पाहिजेत हें अनुमान निघतें.

### ५ वाल, वाल, कम्बल, कांवळें, शाल्मली, सांवरी

१३. ह्याच संबंधांत कांही संस्कृत व मराठी शब्द अुदा० — **वाल, वाल, कम्बल, शाल्मली, कांवळें** व **सांवरी** हे शब्द अुल्लेखनीय आहेत. **'केस'** अर्थवाचक शब्द ऑस्ट्रिक भाषांत पुढीलप्रमाणे आहेत. **बुलु** (मलायी), **बोलाअु** (जरअी), **बुलु** (बटक), **पोलोक** (दगल), **वोलो** (मलगसी). ह्या शब्दांच्या जवळचे **कोपल, वअि, फाय** असे

६. Prizuluski Pre-Aryan and Pre-Dravidian in India, P. 19-20.

७. Chattarji–Some more Austric words in Indo-Aryan. A. O. Con. V. 1928.

८. Prizuluski–Pre-Aryan and Pre-Dravidian. P. 23-24.

**कापूस** ह्या अर्थी शब्द आहेत. ह्या सर्वांच्या मुळाशी **वल** किंवा **वुलु** असा धातु किंवा बीज शब्द असला पाहिजे हें उघड दिसतें. ह्या शब्दांचा आणि संस्कृत **बाल, वाल** ह्या शब्दांचा संबंध दिसतो. ह्याच्या पूर्वीचें अेक रूप **वार** असें वेदांत (२–४–४) आढळतें. **बाल** व **वाल** ह्या संस्कृत शब्दांतील 'ल'मुळे असें वाटतें की हे शब्द अनार्य असावेत. आणि ते आहेतहि असें वरील विवेचनावरून दिसेल. जादुटोणा वगैरे मांत्रिक कृत्यांत केंस म्हणा, लोंकर म्हणा ह्याचा अुपयोग करावा लागत असल्याने हे शब्द त्या मागासलेल्या लोकांचे असावेत. त्यांतहि पुनः **कम्बलम्** ह्या संस्कृत शब्दाने अधिकच त्या विधानाला पुष्टि दिली. **कम्बलम्, शम्बलम्** हे शब्द कानाला परकीच लागतात; अस्सल आर्य शिक्क्याचे दिसत नाहीत. तिबेटी भाषेंत **वल** म्हणजे प्राण्याची लोंकर असा अर्थ आहे. **वलवल** म्हणजे केंसाळ. ऑस्ट्रिक **वल** = केंस ह्या शब्दाला '**क**' हा पूर्वसर्ग लागला, व तो लागतांना मध्ये त्या भाषेच्या स्वभावाप्रमाणे अनुनासिक आला व **कम्बल** असा शब्द झाला. **कम्बल** शब्दाचा अर्थ केंसाळ हरिण असा आहे हें योग्य व दोन्ही शब्दावयवांच्या अर्थाला धरूनच आहे. 'कम्बल'चा पुढे अर्थ लोंकर – लोंकी वस्त्र असा अथर्ववेदाच्या काळांत झाला (अथर्व. १४,२,३६,६७). तसाच प्रकार **शाल्मली, शाल्मल** ह्या शब्दांचा आहे. पाली भाषेंत ह्याचीं **सिम्बली, सिम्बल** अशीं रूपें होतात. ह्यांची अुपपत्ति मूळ अशी : ऑस्ट्रिक मूळ शब्द 'वल'; त्याला पूर्वसर्ग **सा** किंवा **सी** हा लागला व तो लागतांना मध्ये अनुनासिक आला. त्यावरून **साम्बल** किंवा **सिम्बल** हे शब्द तयार झाले, व हींच रूपें पालींत आढळतात. नंतर त्यांचें संस्कृतीकरण करून **शाल्मल, शाल्मली** अशीं रूपें झालीं. मराठी शब्द **सांवरी = कापसाचें रोपटें** हा शब्द त्यापासून व्युत्पादितात.

## ६ केळ, कर्दळी किंवा कर्दळ

१४. केळ, कर्दळी किंवा कर्दळ हे मराठी शब्द आहेत. केळ हा शब्द संस्कृत कदली ह्या शब्दापासून व्युत्पादितात. परंतु **कदली** हा परकी म्हणजे ऑस्ट्रिक आहे, आर्य नव्हे. **केळ** ह्या अर्थाचे द्योतक निरनिराळया ऑस्ट्रिक भाषांतील शब्द पुढीलप्रमाणे आहेत. केलुअि, गेलुअि, ग्लुअि (सकाअी), तेलुअि, केलुअी (जारुम्), तेलुअी (केदाह), तेलि, तेलअि (दारत), तेलू, तेलाय (सकाअी यू. कॉम्) अित्यादि असे ऑस्ट्रिक शब्द आहेत. ह्या सर्वांत **ली, लअी** हा अवयव आहे. पूर्वसर्ग मात्र कोठे **के**, तर कोठे **गे**, तर कोठे **ते** असा भिन्न आहे. हे सर्व अेकाच वर्णाचे भिन्न अुच्चार आहेत. संस्कृतमधील शब्दांत **द** हा वर्ण आला आहे, तो अुच्चारसौकर्यासाठी आला आहे किंवा संस्कृतीकरणांत आला आहे. संस्कृतमध्ये ह्याशिवाय **कन्दली** व **तन्दली** असे शब्द आहेत. शेवटच्या **तन्दली** शब्दाने वरील अुपपत्तीस दुजोराच मिळतो. तेव्हा मराठी केळ शब्दाचें मूळ ऑस्ट्रिक केलुअी आहे. कर्दळी म्हणून दुसरी वनस्पति आहे. तिला साम्याभासाने वरील शब्द लागू केला.

## ७ मातङ्ग, मांग

१५. 'हत्ती' वाचक शब्दांचा संबंध 'हाताशीं' आहे. **हस्तिन्, करिन्** ह्या शब्दांत **हस्त** व **कर** हे शब्द 'हात' अर्थाचे आहेत. तोच प्रकार **मातङ्ग** ह्या शब्दाच्या बाबत असला पाहिजे. ऑस्ट्रोअेशियाटिक भाषांत हातवाचक शब्द पुढीलप्रमाणे आहेत :

---

९. Prizuluski–Pre-Aryan and Pro-Dravidian, P. 6-8,
१०. „ *Ibid* P. 4.

१ मलायी भाषेंत **तोङ्ग, तुङ्ग, ताक**; ख्मेर भाषेंत **दाङ्ग, ताङ्ग**; स्तिअेंग भाषेंत **तोङ्ग** = हाताचें मनगट.

२ मॉन भाषेंत **तोअ, ताअि**; ख्मेर भाषेंत **दाय, ताय**; अनामी भाषेंत **ताय**; पलौंग भाषेंत **ताअि**; संताळी भाषेंत ती.

असे शब्द आहेत. सर्वांचा अर्थ हात असा आहे. संस्कृत शब्दामध्ये **मा + तंग** हे जे दोन अवयव आहेत त्यांतील **तंग** हा अवयव वरील ऑस्ट्रिक शब्दाशीं संबद्ध आहे असें ब्लॅग्डेनचें म्हणणें आहे.[११] मातंग म्हणजे मोठा अगडबंब हात – तसल्या हाताचा प्राणी असा झाला. **मा** ह्या ऑस्ट्रिक शब्दाचा अर्थ मोठा, अगडबंब असा आहे. हा वन्य प्राणिवाचक शब्द पुढे वन्य – रानटी समाजाला लावला. त्यांनाहि **मातंग** म्हणूं लागले. त्यापासून आपला मराठी शब्द **मांग** हा आला.

### ८ मयूर, मयूक, मोर

१६. ह्यांतील पहिले दोन शब्द संस्कृत व तिसरा मराठी आहे. मराठी शब्दाचें मूळ अर्थात् **मयूर** हें असून तें पाली व प्राकृतमधील **मोर** ह्या शब्दावरून आलें आहे. संस्कृत **मयूर** व **मयूक** ह्या शब्दांची मूळ अुपपत्ति ऑस्ट्रिक आहे. कशी ती पहा. ऑस्ट्रिक भाषांत **मोर** ह्या अर्थी पुढील शब्द आहेत. **मकर** (संताळी), **मर** (सवर), **अम्रक** (कॉम), **मेर** (मलायी), **व्रक** (श्राअु), **व्रक्** (स्तीअेंग), **म्रा** (मॉन्). ह्या सर्व शब्दांवरून असें दिसतें की **'रक्'** हा अवयव सर्वांत आहे. **'रक्'** हा संताळी भाषेंत धातु असून त्याचा अर्थ ओरडणें, आवाज करणें, रडणें असा आहे.[१३] त्यावरून **रक** हा शब्द सिद्ध होअून त्याचा अर्थ ओरडणारा – नंतर ओरडणारा पक्षी – झाला. संस्कृतमध्ये **मरूक** असें अेका मोराचें नांव निर्दिष्ट आहे. **मरूक** ह्याच्या जोडीस **मयूक** हाहि शब्द हेमचंद्राने आपल्या कोशांत दिला आहे. **'मयूक'** हाच शब्द पुढे आणखी संस्कृतीकरण होअून **'मयूर'** असा बनला. ह्यांतील **म** हा अवयव **मा** चा संक्षेप आहे. **मा** म्हणजे मोठें, अगडबंब, असें आपणास **मातङ्ग** ह्या शब्दाच्या अुपपत्तीमध्ये कळलें आहे. **मातङ्ग** म्हणजे जसा जनावरांचा राजा तसा **मयूर** किंवा **मयूक** म्हणजे ओरडणाऱ्या पक्षांचा राजा असा त्याला अर्थ प्राप्त झाला. **मातङ्ग** हा शब्द जसा जातिविशिष्ट झाला तसा **मयूर** हा शब्दहि जातिविशिष्ट झाला. **मौर्य** ह्या शब्दाचें भाषांतर चिनी प्रवाशांनी **मोराचा वंश** असेंच केलें आहे.[१४]

### ९ नांगर, लांगल, लांगूल, लिंग, लगुड, लाकूड

१७. हे सर्व शब्द परस्परसंबद्ध आहेत. सर्व ऑस्ट्रिकमूल असावेत. लांगल शब्द वेदामध्ये व महाभारतामध्ये वापरला आहे, परंतु शब्द देशी प्राकृत असून नंतर संस्कृतीकरण झालें असावें. नांगरवाचक ऑस्ट्रिक शब्द पुढीलप्रमाणे आहेत. **अंकॉल्** (ख्मेर), **लिंकार** (खासी), **तेंगॉल** (तेंबी), **तेंगल, तंगाल** (मलायी), **तिंगल** (बताक), **नंकल** (मकस्सारी). ह्या सर्वांत **कल्** हा धातु आहे. त्याचा अर्थ नांगरणें असा आहे. संस्कृतमध्ये **लांगल, लांगूल** ह्याचे दोन अर्थ आहेत : अेक नांगर, दुसरा पुरुषयोनि-लिंग. नांगरवाचक शब्द लिंगवाचक असतात.

११. Prizuluski, Pre-Aryan and Pre-Dravidian, P. 130.

१२. Skeat and Blagden, Vocabulary. Oldenberg, The Religion of Veda, P.71-72

१३. Santali Dict. by Campbell.

१४. Prizuluski, Pre-Aryan and Pre-Dravidian, P. 132.

लिंगवाचक ऑस्ट्रिक शब्दांत लक् हा मूळ शब्द आहे. हाच मूळ शब्द लगुड, लकुट ह्या शब्दांत आहे. वरील कल्ह् हा धातु व लक् हे दोन्ही अेकच असण्याचा संभव आहे. नांगरवाचक, शेपूटवाचक व लिंगवाचक शब्द परस्परसंबद्ध असे आहेत. 'शेप' शब्द दोन्ही अर्थांचा आहे. लिंगवाचक ऑस्ट्रिक शब्द पुढीलप्रमाणे आहेत. लक्, ल, लो (मलायी), क्लुन् (स्टीअेंग), लअो (वाह्नार), लोह् (खासी), लोकू (संताळी), लोकु (मुंडारी).[१५] मराठी लिंगवाचक ग्राम्य शब्द ह्या शब्दापासून आला आहे काय? (अपूर्ण)

---

# नाटक, चित्रपट आणि ध्वनिनाटिका*

(श्री. के. नारायण काळे)

मराठी रंगभूमीवर होणाऱ्या नाटकांच्या तंत्राचें विश्लेषण करून तें चित्रपट व ध्वनिनाट्य यांच्या तंत्राशीं कितपत जुळतें आहे, किंवा त्यामध्ये काय फरक आहेत, तें थोडक्यांत येथे पाहावयाचें आहे.

अशा तऱ्हेने तुलना करून त्यांतील साम्य-भेद विशद करावयाचे म्हटले तर या भिन्न भिन्न माध्यमांतील मूलभूत फरक, त्यांच्या मर्यादा, विशेष शक्ति आणि शक्याशक्यता यांची आपणा सर्वांना पूर्णपणें कल्पना आहे, माहिती आहे, असें गृहीत धरून चालणें मला प्राप्त आहे. परंतु असें गृहीत धरणें फार धोक्याचें आहे असा माझा अनुभव आहे. कांही चांगल्या सुशिक्षित आणि नाट्यविषयक बाबींत स्वतःला तज्ज्ञ समजणाऱ्या मंडळींशीं बोलत असतांना मला हें आढळून आलें आहे. बऱ्याच बाबतींत परंपरेने आलेले समज गैरसमज हीं चांगलीं शहाणींसुरतीं माणसेंहि फारसा स्वतंत्र विचार करण्याची तसदी न घेतां अुराशीं कवटाळून बसलेलीं असतात. म्हणून मी, आपला विषय वास्तविकतः मराठी रंगभूमीपासून सुरू होत असतांहि, थोडें मागे जाअून रंगभूमि, चित्रपट व ध्वनिनाट्य यांच्या वास्तविक स्वरूपांतील साम्य-भेदांपासून त्याला सुरवात करणार आहें. मूलभूत गोष्टी ध्यानीं आल्यावर अेखाद्या विशिष्ट प्रकाराशीं त्या ताडून जोडून पाहणें ही बाब फारशी कठीण नाही; पण मूलभूत गोष्टींचीच जर नीटशी कल्पना नसेल, तर विशिष्ट प्रकाराशीं त्यांची जुळणी करून त्यावर बांधलेल्या अिमारती वाळूच्या पायावर बांधल्यासारख्या ठरतील; त्या कोलमडून पडावयाला फारसा वेळ लागणार नाही.

नाटक-चित्रपट-ध्वनिनाट्य या तिहींना आपण नेहमी अेकत्र आणतों. त्यांच्यामध्ये परस्पर साधारण असे कांही घटक असल्यामुळे त्या सर्वांचें स्वरूप अेकाच प्रकारचें आहे,

---

१५. ,, *Ibid* P. 9-12.

* 'अखिल भारतीय नभोवाणी'वर मुंबअी येथे ता. २३ नोव्हेंबर १९४३ रोजीं केलेल्या अेका भाषणाच्या हस्तलिखितांत कांही फरक करून मुंबअी नभोवाणीकेंद्राधिकाऱ्यांच्या परवानगीने साभार मुद्रित. —के. ना. का.

त्यांची जात अेकच आहे, त्यांचे धर्म समान आहेत, अशी वर वर पाहतां सामान्यपणें आपली समजूत होते. फार कशाला, परवां सांगली येथे झालेल्या नाट्यशताब्द अुत्सवाच्या अध्यक्षांनीहि आपल्या अधिकारवाणीने चित्रपट ही नाट्यकलेची विकसित स्थिति आहे म्हणून जाहीर विधान केलें. मराठींतील नियतकालिकांतून नाटक व चित्रपट यांच्या र्‍हास-विकासावर चर्चा करणारे जे अनेक कळकळीचे आणि विद्वत्तापूर्ण लेख प्रसिद्ध होत असतात, त्यांतहि सामान्यपणें नाटक आणि चित्रपट हीं अेकाच कलेचीं दोन अंगें आहेत, असा कायम सूर काढलेला आढळतो.

आणि याचें कारण उघड आहे. रंगभूमीवरील नाटकांत कथानक असतें, चित्रपटांतहि तें असतें; नाटकांतील कथानकाचा भूमिकांच्या कृतींच्या द्वारा आविष्कार होतो, चित्रपटांतहि तोच प्रकार आढळतो; रंगभूमीवर पात्रांचा स्वभाव परिपोष अभिनयाच्या व संवादाच्या द्वारा होतो, चित्रपटांतहि तो तसाच होतो. अितकीं साम्यें असल्यावर चित्रपट व नाटक अेकरूप आहेत असा निष्कर्ष कोणीं काढला तर त्यांत काय आश्चर्य ? अुलट आज मीं आपणाला म्हटलें की हा निष्कर्ष चुकीचा आहे तर तेंच आपणाला अधिक आश्चर्यकारक वाटेल. कारण माझी खात्री आहे की बहुशः आपलेंहि मत नाटक व चित्रपट हीं अेकाच कलेचीं दोन अंगें आहेत असेंच असेल. पण आपली क्षमा मागून मी नम्रपणें आपणाला सांगूं अिच्छितों की तसें असेल तर या बाबतींत माझा आपणांशीं मतभेद आहे.

प्रथमारंभीं मी आपल्या हें नजरेला आणूं अिच्छितों की केवळ कांही घटकांचा परस्पर-साधारणपणा हें कारण दोन कला अेकाच स्वरूपाच्या, अेकाच जातीच्या आहेत असें गृहीत धरण्यास पुरेसें नाही. अुदाहरणार्थ, आपण काव्य आणि संगीत या दोन कला घेअूं. या दोहों-मध्येहि स्वर, ताल, शब्द, अर्थ, भावनाविष्कार, हेतु अित्यादि अनेक परस्परसाधारण घटक आहेत; पण त्यावरून या दोन कला अेकरूप आहेत असें कोणी म्हणूं लागला, तर आपण त्याला अडाणी म्हणाल; कारण या सर्व घटकांचें साधारण अस्तित्व असतांहि या दोन्ही कलांची आपलीं आस्वादक अिंद्रियें भिन्न आहेत व त्यामुळे त्या कलांमधील भिन्न भिन्न घटकांना मिळणार्‍या महत्त्वाला अुघड अुघड कमजास्तपणा येतो. संगीतांत तालस्वरांना प्राधान्य राहून शब्दार्थ हा पूरक असतो, तर अुलटपक्षीं काव्यांत शब्दार्थाला प्राधान्य असून स्वर, ताल हे अर्थाच्या भूषणाच्या, सौंदर्यसाधनाच्या स्वरूपाचे असतात. त्यामुळें संगीत आणि काव्य या दोन कलांत अितके परस्परसाधारण घटक असूनहि त्या दोन कला परस्परांपासून वेगळें अस्तित्व पावतात. चित्रकला व मूर्तिकला यांच्याबद्दलहि असेंच म्हणतां येअील. तेथे फरक पडतो तो परिमाणांत पडतो. मूर्तिकलेंत लांबी, रुंदी, जाडी हीं तिन्ही परिमाणें येतात. यामुळे मूर्तिकलाकृति घनस्वरूप राहते, तर चित्राला जाडी हें परिमाणच नसतें. यामुळे त्यांमधील घनता छाया-प्रकाशाने आणि रेषांच्या रचनेने दर्शित करावी लागते. परिमाणांतील अेक अशा रीतीने मुळांतच घटल्यामुळे चित्रकला व मूर्तिकला या दोन्ही कलांत अनेक साधारण घटक असूनहि, वर्गीकरण करतांना त्यांना वेगवेगळ्या कला म्हणून मानणें शास्त्रीय दृष्ट्या आवश्यक ठरतें.

काव्य आणि संगीत व चित्रकला आणि मूर्तिकला यांच्यासंबंधांत जें दाखवून दिलें त्याच कारणासाठी नाटक व चित्रपट या परस्परांपासून भिन्न अशा वेगवेगळ्या कला आहेत आणि रंगभूमीवरील नाटक व चित्रपट यांच्या बाबतींत जें खरें आहे तेंच ध्वनिनाटिकेला लागू आहे.

रंगभूमीवर कथानकाचा भूमिकांकडून जो आविष्कार होतो तो हाडामासांच्या जिवंत माणसांच्या द्वारा होतो. रंगभूमीला आणि तीवर वावरणाऱ्या माणसांना लांबी, रुंदी, उंची अशीं तिन्ही परिमाणें असतात. रंगभूमीवरील पात्रांची जी हालचाल होते तीहि त्रिपरिमाणात्मक स्थलांत होते. यामुळे त्या कलेंत जे कांहीं रचनाबंध निर्माण होतात ते त्रिपरिमाणात्मक अपेक्षेने समतोल व गतिमान होतील अिकडे रचनाकर्त्याला लक्ष्य देणें आवश्यक असतें. अुलटपक्षीं चित्रपटावर लांबी व रुंदी या दोनच परिमाणांचें प्रकटन करतां येतें. जाडी या तिसऱ्या परिमाणाचा आभास दाखवावयाचा तर तो रेखात्मक रचनाबंधाने किंवा छाया-प्रकाशांच्या सापेक्षतेने दर्शित करावा लागतो. त्याच्या प्रत्यक्ष निदर्शनाची तेथे शक्यता नसते. हीच परिस्थिति भूमिका प्रकटन करणाऱ्या व्यक्तींचीहि. त्यांची छायात्मक प्रतिकृति चित्रपटावर प्रकटवून जिवंत रक्त-मांसाच्या माणसाचा आभास निर्माण करण्याचा कितीहि कलात्मक प्रयत्न केला, तरी साक्षात् हाडामांसाची व्यक्ति आणि तिचा छायात्मक आभास यांमधील अंतर एका परिमाणाच्या न्यूनतेमुळे पूर्णपणें तुटणें कधीच शक्य नाही. या अुणीवेमुळे मूलभूत स्वरूपाचा फरक या दोन कलांतील रचनाबंधांत पडतो. चित्रपटांतील रचनाबंध रेखात्मक किंवा छायाप्रकाश यांच्या धनता मूल्यपर असतो; तर रंगभूमीवरील रचनाबंध शब्दसंघात्मक आणि त्रिपरिमाणरूप स्थलांत होणाऱ्या हालचालीच्या संघटनामूल्यपर असतो. रचनाबंधांतील फरक आणि परिमाणांतील अुणेअधिक-पणा यामुळे नाटक व चित्रपट या दोन प्रकारांच्या शक्यता, सापेक्षता व मर्यादा यां-मध्ये फार मोठी मूलभूत तफावत पडते. चित्रपटाने रंगभूमीवरील नाटकाचें कथानक आत्मसात् केलें असलें; त्यांतील स्वभावपरिपोषात्मक अभिनय आपलासा केला असला, तरी चित्रपट हा नाट्यकलेचा विकास नव्हे. तात्विक आणि अैतिहासिक अशा दोन्ही दृष्टींनी, तो तसा आहे हें विधान चुकीचें आहे. चित्रपट हा छाया-चित्रणकलेचा विकास आहे. त्यामुळे नाट्या-पेक्षा चित्रकलेशीं त्याचे वांशिक संबंध अधिक जवळचे आहेत. चित्रकला ही त्याची खरी जात-कुळी आहे; नाटक ही नव्हे. नाटकामध्ये दृश्य किंवा चित्र जसें पोषक आणि पूरक म्हणून येअूं शकेल व त्यामुळे नाटकाला उठावदारपणाहि प्राप्त होअील, त्याप्रमाणेच चित्रपटांत वाक्य हें चित्रात्मक रचनाबंधाला पूरक व पोषक म्हणून येअूं शकेल व त्यामुळे चित्रपटाच्या परिणामकारकपणांतहि भर पडेल. पण केवळ परस्परांच्या साहचर्याने व सहकार्याने परस्परांचा परिपोष होतो म्हणून त्यांना अेकजातीय म्हणणें चूक आहे. कारण त्यांचीं आपलीं ग्रहणेंद्रियें मूलतः भिन्न आहेत.

रंगभूमीवरील नाटक प्रेक्षक पाहतो हें खरें पण प्रेक्षक व नट यांमधील अंतर लक्ष्यांत घेतलें तर तो तें अैकतो असें त्याचें वर्णन करणेंच अधिक यथार्थ होअील. नाटक हें जितकें दृश्य आहे त्याहून अधिक श्राव्य आहे. शुद्ध काव्याच्या तुलनेने नाटक अधिक दृश्य स्वरू-पाचें असलें तरी चित्रपटाच्या तुलनेने ते तसें नाही. यामुळे नाटकांत नटाने अुच्चारलेला शब्द हा त्याचें वास्तव माध्यम होय. यामुळे नाटकांत नाट्यवस्तुप्रकटनाचा मुख्य भर संवादावर पडतो आणि कृति ही संवादाला पूरक म्हणून तिचा नाट्यप्रयोगांत दुय्यम दर्जाने अंतर्भाव होतो. यामुळे नाटक हें 'वाङ्मय' आहे. चित्रपटाचें तसें नाही. चित्रात्मक रचना हें चित्रपटाचें माध्यम होय. प्रेक्षक व पाहावयाची व्यक्ति किंवा वस्तु यांमधील अंतर कितीहि कमीजास्त करणें, वेग-वेगळ्या दृष्टिकोनांनी ती पाहतां येण्याची सोय करतां येणें चित्रपटांत शक्य असतें. नटाच्या नुसत्या चेहऱ्यावरील भाव, त्याच्या नुसत्या हस्तपादादि अवयवांचा व्यापार, पाहिजे त्या दृष्टिकोनाने प्रेक्षकांना रंगभूमीवरून कधीहि पाहातां येणार नाही. पण चित्रपटांत तें परिणामकारकरीत्या

चित्रप्रबंधरचना करून दाखविता येते. चित्ररचना हें चित्रपटाचें माध्यम असल्यामुळे त्यामधील वाङ्मयाचें अस्तित्व मूलभूत अधिष्ठानाच्या स्वरूपाचें ठरत नाही. यामुळे चित्रपट ही 'दृश्यमय' कला आहे. 'वाङ्मय' नव्हे. मराठी नाटककार, नट, दिग्दर्शक, टीकाकार यांच्या लक्ष्यांत अजून हा मूलभूत स्वरूपाचा फरक, वर वर पाहतां अेकरूप वाटणाऱ्या या दोन कलांत आहे हें पुरतेपणीं आलेलें दिसत नाही. म्हणून नाटकाकडून चित्रपटाचें व चित्रपटाकडून नाटकाचें काम करून घेण्याचा अट्टाहास ते अनेकवार धरीत असलेले दिसतात. रंगभूमीवरील प्रथितयश नाटककारांना, आपल्या लिखाणाचा चित्रपटांच्या दिग्दर्शकांनी या कानापासून त्या कानापर्यंत गळा कापला, असें या गैरसमजामुळेच अनेक वेळां म्हणावेंसें वाटतें. रंगभूमीवरील कांही लोकप्रिय नाटकांचें चित्रपटांत रूपान्तर झाल्यावर तें पाहतांना त्यांच्या प्रेक्षकांची निराशा होते ती यामुळेच. त्यांची ते चित्रपट पाहावयाला जातांना अशी अपेक्षा असते की रंगभूमीवर त्या नाटकांचा प्रयोग पाहत असतां त्या नाटकांतील ज्या वाङ्मयाने आपल्या अंतःकरणाची पकड घेतली होती त्याचा प्रभाव आपणाला त्या नाटकावरून तयार केलेल्या चित्रपटांतहि पाहावयाला सांपडेल. पण ही अपेक्षा मूलतःच 'अप्रतिष्ठित' असल्यामुळे त्यांची निराशा होणें ही गोष्ट टळण्यासारखी नसते. चित्रपटांत नाटकाच्या विषयांतील 'वाङ्मय' भाग संक्रांत व्हावयाचा नसून 'दृश्यमय' भाग, जो रंगभूमीवर परिणामकारकरीत्या प्रकट होणें शक्य नसतें, तेवढा विशेष परिणामकारक रीतीने चित्रित व्हावयाचा असतो व वाङ्मयात्मक भाग चित्रपटांत केवळ पूरक म्हणून राहूं शकतो. नाटकाचें चित्रपटांत संक्रमण होणें हें केवळ वेषांतर नसून अवस्थांतर असतें, रूपांतर असतें, माध्यमांतर असतें. यामुळे त्या दोन रूपांत जो फरक पडतो तो मूलभूत स्वरूपाचा आहे. अेकच विषय अेकदा काव्यांत वर्णिला, आणि दुसऱ्यांदा गायनाने प्रकट केला, तर त्यांत जितका फरक पडेल तितका हा फरक असतो. कारण नाटकाचें ग्रहणेंद्रिय आपला कान असतो तर चित्रपटाचें ग्रहणेंद्रिय आपला डोळा असतो. मराठी नाटक व मराठी चित्रपट यांचे लेखक, निर्माते व प्रेक्षक ही गोष्ट नीटपणें ध्यानांत घेअून या दोन्ही कलांच्या प्रगतीसाठी योग्य दिशेने प्रयत्न करतील, तर अंधारांत चाचपडत राहिल्याप्रमाणे सध्या जो गोंधळ अुडालेला आहे तो पुष्कळच नाहीसा होण्याला मदत होअील.

जी स्थिति चित्रपटाची तीच ध्वनिनाटिकांची. ध्वनिनाटकांत तर श्रोत्यांच्या दृष्टीपुढे पार्श्वभूमीहि नसते, आणि पात्रेंहि नसतात. श्रोत्याने नुसत्या श्रवणाने ग्रहण करण्याची ही कला आहे. अर्थात् हिचें तंत्र चित्रपट व रंगभूमीवरील नाटक यांपेक्षा मूलतः भिन्न असणार हें अुघड आहे. पण ध्वनिनाटकें लिहितांना व त्यांचे प्रयोग करतांना या गोष्टीकडे फारसें लक्ष्य दिलेलें दिसत नाही. रंगभूमीवरील नाटकांत संवाद असतात, चित्रपटांत संवाद असतात. यांतहि संवाद असतात. अेवढ्या ठोकळ साम्यावर श्वानम् युवानम् मघवानम् या न्यायाने या प्रकाराकडे पाहिलें जात आहे असें वाटतें. नाटकांतील संवाद आणि चित्रपटांतील संवाद यांचें कार्य व महत्त्व हीं अेक नाहींत, हें आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून आपल्या लक्ष्यांत आलेंच असेल. ध्वनिनाटकांतील संवादाचें स्वरूप व कार्य, या दोहोंपेक्षाहि भिन्न आहे, हें आता आपण ध्यानांत घेतलें पाहिजे. नभोवाणीच्या द्वारा अैकूं येण्याऱ्या संवादांतील मर्म व अर्थ हीं केवळ त्यांतील शब्दांचा अुच्चार, आवाजाचा लहानमोठेपणा, स्वराचा चढअुतार अित्यादि अुच्चारशास्त्रांतील वैशिष्ट्यांच्या साहाय्यानेच अैकणाऱ्याच्या अंतःकरणांत अुतरावयाचीं असतात. त्यांची परिणामकारकता वाढवावयाला मुद्रेचें साह्य नाही, हस्तादि अवयवविक्षेपांची मदत नाही, हालचालीची जोड नाही किंवा दृश्यांची पुरवणी नाही. कानांनी शब्द

ऐकत असतां असतांमाच त्यांमधील कल्पना, भावना, व प्रतिमा श्रोत्यांच्या अंतःकरणांत साक्षात् स्वरूपांत अवतीर्ण होत गेल्या पाहिजेत, ही या माध्यमाची प्राथमिक आवश्यकता आहे. संवाद लिहितांना आणि ते प्रयोगरूपाने ध्वनिक्षेपकापुढे बोलतांना लेखकाने व प्रयोगकाराने या गोष्टीकडे सतत ध्यान ठेवलें पाहिजे. अमूर्त शब्दद्वारा भिन्न भिन्न वयाच्या, दर्जाच्या, शिक्षणाच्या, संस्कृतीच्या श्रोत्यांच्या अंतःकरणांत आपणाला पाहिजे असेल ती ऐकच ऐक नेमकी प्रतिमा निर्माण करील असा शब्द योजणें व तो तशाच रीतीने उच्चारणें हें ध्वनिनाट्याला अत्यंत आवश्यक आहे. शब्दोच्चारावरून बोलणाऱ्या व्यक्तींतील अंतर, त्यांची सापेक्ष स्थानें व दिशा, दर्शित होतील अशा रीतीने ध्वनिनाटकांतील पात्रांनी बोलणें जरूर आहे. ध्वनिनाट्य हा कलाप्रकार अजून बाल्यावस्थेत आहे. नावीन्याच्या कौतुकावरच अजून त्याची लोकप्रियता बव्हंशी अवलंबून आहे. यथाकाल त्याचा जो काय विकास होईल तो खरा!

---

# ऐतिहासिक भाषाशास्त्र आणि मराठी

(श्री. ग. वा. तगारे)

म. सा. पत्रिकेच्या मागील (आक्टोबर १९४३) अंकांतील 'कांही व्युत्पत्ति' चाळत असतां भाषाशास्त्राच्या अनिश्चितपणाबद्दल वाचक गोंधळल्यास नवल नाही. विष्ठा > विठ्ठल, भगवान् > vagabond या अतर्क्य व्युत्पत्ति देणारांची मी दखल घेऊं इच्छित नाही, किंवा शास्त्रशुद्ध विचार करण्याचा प्रयत्न करणारे श्री. मोडक, प्रियोळकर किंवा वैद्य यांच्याबद्दल मला कांहींच म्हणावयाचें नाही. पण राष्ट्रांतरीय कीर्तीचे भाषाकोविद जेव्हा चमत्कारिक मतभेद दर्शवितात तेव्हा कोणाचा कोणाला संक्षेप घालावयाचा हें ठरवणें कठिण पडतें. भाषाशास्त्र हें 'शास्त्र' नसून मतमतांतरांच्या गलबल्याचें प्रदर्शन आहे असें सामान्य शिक्षितांस वाटल्यास त्यांत त्यांचा दोष नाही. उदा० मराठी 'असो'=राहो हा शब्द घेऊं. हा शब्द पाली व प्राकृत √ अच्छ पासून आला याबद्दल मतभेद नाही. पण याचा मूळ संस्कृत धातु कोणता हें वादग्रस्त आहे.

आजपर्यंत याबद्दल पुढील सहा धातु सुचविण्यांत आलें आहेत :—

(१) आ—स्था > * आ—च्छा : हर्न्ले— A Comparative Dictionary of the Bihari Language पृ. ९३, यांत इ. स. १८८५ पर्यंतची या शब्दाची चर्चा आली आहे.

(२) गच्छ् :— शब्दारंभींच्या ग् चा लोप होऊन : वेबर—हालाचें सप्तशतक, पृ. ५५६. ब्यूलर— Beiträge zur Grammatik des Jaina-Prakrit पृ. ३६, लॉयमान्— औपपातिक सूत्र पृ. ९३, पिशलने आपल्या 'प्राकृतभाषां'चें व्याकरण (Grammatik der Prakrit-Sprachen) §४८० मध्ये वरील उपपत्ति अमान्य केली आहे.

(३) ऋच्छ्— पिशल– Grammatic der Prakrit-sprachen §४८०, तसेंच प. वा. ग्रियर्सन– Garbe Festgabe पृ.२४.

(४) आस्:— हेमचंद्र– प्राकृत व्याकरण ८.४.२१५, तसेंच सद्दनीति व मोग्गलान-व्याकरण हीं Critical Pali Dictionary त अुद्धृत केलेलीं पाली व्याकरणें (अच्छति पाद्दा); त्याचप्रमाणे पिशलसंपादित हेमचंद्राचें प्राकृत व्याकरण पृ १५५, चाइल्डर्सचा पालीकोश (A Dictionary of the Pali Language) आणि हुर्न्ले– A Comparative Grammar of the Gaudian Languages पृ.३६६ (√अस्‌चीहि शक्यता मान्य). पिशलच्या मतें— आणि हेंच मत गायगरने आपल्या पाली व्याकरणांत (Pali Literatur und Sprachet §१३५) मान्य केलें आहे—√अच्छ मधील – च्छ भा. यु. (भारत-युरोपीय = Indo-Europeon)–*स्के प्रत्ययापासून आला.

(५) अस्:— प्राकृत व्याकरणकार वररुचि १२.१९. क्रमदीश्वर ४.१०, रामशर्मतर्क-वागीश व मार्कण्डेय (ग्रियर्सन– Memoirs of the Asiatic Society, Bengal ८.२, पृ.८८ वर उद्धृत), कूनचे मतें √अच्छ मधील– च्छ भा. यु.–*स्के–प्रत्ययापासून (पिशल– प्राकृत व्याकरण §४८०), तसेंच लेव्हि व मेय्ये– Mèmoires de la Sociètè de Linguistique de Paris. १८ पृ.२८, झुल ब्लोक– मराठी भाषेचा विकास पृ.३५६-५७, ॲण्डरसन् व स्मिथ्– critical Pali Dictionary.

सनातर (Les Inscriptions de Piyadasi पृ.१३८) व योहान्सोन (Indo-germanische Forschungen. ३. पृ.२१०). अशोकाच्या शहाबाजगढी शासनांतील (५.११) 'अच्छंति' हा 'अस्'चा भविष्यकाळ समजतात.

(६) आ– क्षि:— टर्नर– Bulletin of the School of Oriental Studies, London ८.२-३. पृ.७९५-८१२.

'असो' या शब्दाच्या व्युत्पत्तीसंबंधी मतभेदांचें हें संक्षिप्त कोष्टक वाचून सामान्य वाचक बुचकळ्यांत पडल्यास आश्चर्य नाही. कारण वररुचि-हेमचंद्रादि प्राचीन प्राकृत व्याकरणकार किंवा पिशल्, लेव्हि, मेय्ये, ब्लोक, टर्नर अि० दिगंत कीर्तीचे भाषाशास्त्रज्ञ यांच्यांत श्रेष्ठ कनिष्ठ कोणी व कसें ठरवावयाचें ? मताधिक्याची राजकीय पद्धत शास्त्रांत निरुपयोगी ठरते. मग भाषाशास्त्र हें 'नैको मुनिर्यस्य वचः प्रमाणम्' असलेलें गूढ शास्त्र आहे काय ? आणि तसें नसल्यास या गोंधळांतून सोडवणारी शक्य तितकी निर्दोष अभ्यास-पद्धति नाही काय ? अि० मूलग्राही प्रश्न निर्माण होतात.

भाषाशास्त्राचा आरंभ वेदकालाअितका जुना असला किंवा पाणिनीच्या काळापर्यंत आपण पुष्कळच प्रगति केली असली तरी आजच्या ज्या व्यापक अर्थाने आपण 'भाषाशास्त्र' हा शब्द वापरतों त्या अर्थी या शास्त्राची वाढ अर्वाचीन– १९ व्या शतकांतील– आहे. आणि त्या काळीं रूढ असलेल्या 'नवव्याकरणकारां'च्या 'शुद्ध' तौलनिक पद्धतींत वरील पंडितांपैकी बरेच जण वाढल्यामुळे अुपर्युक्त विद्वानांचीं अशीं विलक्षण मतमतांतरें निर्माण झालीं. निरनिराळ्या संलग्न भाषांतील शब्दांची स्थलकालनिरपेक्ष तुलना करतांना असें होणें अपरिहार्य असतें. त्या अभ्यासपद्धतीने कांही प्रगति झाली असली तरी तोखारियन् व हिटाअिट या आर्यभाषांतील लेख अुपलब्ध झाल्यावर असे चमत्कारिक प्रश्न निर्माण झाले की

भिन्न पण सजातीय (cognate) भाषांचा अैतिहासिक दृष्टि न ठेवतां केलेला नुसता तौलनिक अभ्यास अपुरा पडतो ही जाणीव भाषाशास्त्रज्ञांस झाली. या अभिनव अभ्यासपद्धतीस 'अैतिहासिक भाषाशास्त्र' असें नांव दिलें आहे.

डॉ. सु. मं. कत्रे यांनी आपल्या १९४१ मधील विल्सन् फायलॉलॉजिकल लेक्चर्स-मध्ये 'अेका विशिष्ट भाषाकुलांतील प्रत्येक भाषिक विशेषाचा शक्य तितका स्थलकालात्मक संदर्भ लक्षांत घेअून त्या विशिष्ट भाषेचा कालिक व स्थानिक विकास रेखाटणारें तौलनिक व्याकरणशास्त्र' (The science of comparative grammar applied to a given family of languages, consciously attempting to place before oneself the space-time context of each linguistic fact so far as it is determinable and thus to build up a linguistic approach at once chronological and regional—(भारतीय विद्या २.पृ.२२०-२१) अशी या भाषाशास्त्राची व्याख्या केली आहे. भा. आ. (भारतीय आर्य = Indo-Aryan) भाषांत परस्परांतून अितक्या मोठ्या प्रमाणावर अुसनवारी झालेली आहे की समभाषांगरेखणाची (isoglosses) पद्धत येथे निरुपयोगी ठरते. अशा परिस्थितींत 'अैतिहासिक भाषाशास्त्रा'ची अभ्यासपद्धति स्वीकारून आपल्या भा. आ. भाषांच्या ज्ञानांतील वैगुण्यें भरून काढण्याखेरीज आपणांस गत्यंतर नाही. आणि ही अेकच पद्धत अुपरिनिर्दिष्ट गोंधळांतून तूर्त मार्गदर्शन करूं शकते.

स्थल आणि काल हे या अभ्यासाचे विशेष मान्य केले की मराठीच्या अुत्पत्तीविषयी आजपर्यंत मांडल्या गेलेल्या अुपपत्तींतील अुणीवा किंवा मराठी शब्दांच्या व्युत्पत्तींतील दोष अुघडे पडतात. भाषिक अुसनवारी झाली तरी महाराष्ट्रांत झालेल्या भाषिक विकासाची गेल्या २४०० वर्षांतील अखंड परंपरा दाखवणारे लेख अुपलब्ध असल्यामुळे अुगीच कोठल्या तरी प्राकृत भाषेशीं तिचा संबंध दाखविण्याचें कारण नाही, किंवा विशिष्ट भाषिक प्रवृत्तींचे अुत्पत्ति-स्थिति-लय, कालमर्यादित असतात (अुदा० द्विस्वरान्तर्गत क्, ग्, च्, आदि वर्णांचा लोप करण्याची प्रवृत्ति अि. स १२००चे सुमारास भा. आ. भाषांतून लुप्त झाली किंवा तत्पूर्वी तिच्यांत स्थलकालवैचित्र्य होतें; हल्ली recursives या नांवाने ओळखले जाणारे ध्वनि कांही विशिष्ट आ. भा. तून आढळतात अि०) वगैरे गोष्टी सूर्यप्रकाशाअितक्या स्पष्ट झाल्यामुळे प्रा. झुल् ब्लोकसारख्या विद्वानाने जरी सं. तड्<द्राविडी तट्टु, सं. अट्<द्रा. आट्टु अशा व्युत्पत्ति सुचवल्या तरी सं. तड् <तृद्, सं. अट् <ऋ-त् यांचें सत्यत्व लोपत नाही. प्रा. भा. आर्य. (प्राचीन भारतीय आर्य = Old Indo Aryan) भाषांत लुप्त ऋ मुळे मूर्धन्य वर्ण आल्यामुळे मुद्दाम द्राविडी भाषांकडे धाव घेण्याचें कारण नाही. सारांश, दिवसें-दिवस भाषाशास्त्र अधिकाधिक निश्चित स्वरूपाचें होत जाण्याचें श्रेय या अैतिहासिक भाषा-शास्त्राला आहे.

प्राचीन भारतीय ग्रंथांचे स्थल-काल ठरवतांना फार अडचणी येतात हें मान्य पण विशिष्ट कालखंडांचा क्रम आता निश्चित झाला आहे. अुदा० भारतीय आर्यभाषांचे प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन असे तीन खंड कल्पून सामान्यतः अि. स. पूर्व १५०० (?) ते अि. स. पूर्व ६०० प्राचीन भारतीय आर्यभाषा, अि. स. पूर्व ६०० ते अि.स. १००० मध्ययुगीन आर्य-भाषा, अि.स. १००० नंतर अर्वाचीन आर्यभाषा या त्यांच्या मर्यादा मान्य करण्यांत येतात. या प्रत्येक कालखंडामध्ये संक्रमणावरचेची अेकदोन शतकें मान्य करून त्यांतील आणखी पोटविभाग (अुदा० प्रा.भा. आ. मध्ये संहिताकाल, ब्राह्मणकाल, सूत्रकाल अि०) साधारणपणें ठरले आहेत.

अशा तऱ्हेने भा. आ. भाषांची रूपरेषा स्पष्ट झाल्यामुळे व पौर्वात्य आणि पाश्चात्य पण्डितांच्या प्रयत्नाने बऱ्याच संस्कृत-प्राकृत ग्रंथकारांचे स्थल-काल निश्चित होत चालल्यामुळे आता या अडचणींचा अवास्तव बाऊ करण्यांत अर्थ नाही.

मराठीचा प्राचीन अितिहास लिहिणारास आधारभूत होणारें साहित्य कांही थोडें नाही. यांत अि.स. पूर्व ४०० ते अि.स. ४०० पर्यंत खोदलेल्या महाराष्ट्रांतील प्राकृत शिलालेखांना पहिलें व मानाचें स्थान द्यावें लागेल. देशावर कार्ले, भाजें, बेडसें, नाणेंघाट, जुन्नर, शेलारवाडी, कऱ्हाड, कोल्हापूर, नाशीक, पित्तळखोरें (पूर्व खानदेश, चाळीसगांवचे दक्षिणेस बारा मैलांवर पाटणजवळ) आणि अजिंठा, व कोकणांत कुलाबा जिल्ह्यात कुडें, कोंडाणें, कोल, महाड, मोर संस्थानांतील नाडसूर, मुंबअीजवळ कान्हेरी व पडण आणि ठाणें जिल्ह्यांत सोपारा जवळ वकालें, मध्यप्रांतांत वाशीम (अकोला जि.) आणि पवनी (भंडारा जि.)— या स- ठिकाणीं मिळून अि.स.४०० पर्यंतचे २१७ प्राकृत शिलालेख सध्या अुपलब्ध आहेतवं यांपैकी बरेच दानपत्राच्या स्वरूपाचे असल्यामुळे ते बहुजनसमाजास समजण्यासाठी त्यांच्याच (बहुजनसमाजाच्या) बोलींत लिहिले आहेत हें अुघड आहे. वाङ्मयनिबद्ध भाषा बहुजनसमाजाच्या बोलीपासून भिन्न असते— ती कदाचित् त्या काळीं मृतहि असूं शकेल— अि० आक्षेप या शिलालेखांतील भाषेला लागू पडत नाहीत. शिवाय त्यांचा स्थलकाल निश्चित असल्यामुळे (निदान स्थलनिश्चिति निर्विवाद असतेच) यांतील रूपें भाषिक अितिहासास बहुमोल असतात. सारांश, महाराष्ट्रांतील भाषिक प्रवृत्तींच्या अितिहासाला हीं साधनें आवश्यक आहेत.

याच्याच जोडीला महाराष्ट्रांत रचलेले व निश्चित काल माहीत असलेले प्राकृत व अपभ्रंश ग्रंथ, आणि संस्कृत ग्रंथ व शिलालेख यांत आढळणारीं 'अशुद्ध' रूपें या भूविभागांतील भाषिक विकास दाखवतात. संस्कृतमधून मराठीचा अितिहास आढळेल या विधानाबद्दल साशंक असण्याचें कारण नाही. 'सद्धर्मपुण्डरीक' या बौद्धसंस्कृत ग्रंथांतील 'अशुद्ध' संस्कृतावरून, मूळ बौद्ध धर्मग्रंथ पालींत नसून अर्धमागधी व अपभ्रंश यांच्याशीं साधर्म्य असलेल्या अेका प्राकृतमध्ये असावेत ही गोष्ट अमेरिकेंतल्या येल विद्यापीठांतील प्राध्यापक फ्रँकलिन् एड्गर्टनी दाखवली आहे (BSOS.८.५०१–५१६) आणि पालीप्रत्ययप्रक्रियेंतील अपभ्रंश स्वरूपाचे प्रत्यय त्याच्या शोधाला पुष्टि देतात.

या दृष्टीने विचार करतां भवभूतीचीं नाटकें, अि.स.च्या ८व्या शतकांतील जैन संस्कृतमध्ये जिनसेन-गुणभद्रांनी लिहिलेलें महापुराण व महाभारताच्या महाराष्ट्रांतील प्रतींत आढळणारे पाठभेद यांचें महत्त्व विशेष आहे. संस्कृत शिलालेखांमधील 'अशुद्धें' अशींच उद्बोधक ठरतील. पुष्पदन्त-कनकामरांच्या वाङ्मयाबद्दल मीं मागे लिहिलें असल्यामुळे पुनरुक्ति करीत नाही.

वर सांगितलेल्या पद्धतीने भाषिक साहित्याचें स्थल-कालदृष्ट्या वर्गीकरण करून वर्ण व प्रत्ययप्रक्रियांचा विकास रेखाटतांना आपल्या आवडत्या 'सिद्धान्तां'ना किंवा कल्पनांना अथवा आपल्यास पूज्य असणाऱ्या पण्डितांच्या मतांना मुरड घालणें किंवा तिलांजलि देणें भाग पडतें. तसेंच, व्युत्पत्तिचर्चा करतांना शुद्ध तौलनिक पद्धत स्वीकारणाऱ्या पण्डितांच्या चुका अुघड्या पडतात. अुदा० पॉल थाअिमने आपल्या ZDMG. ९३ मधील Indisches Wörter und Sitte या निबंधांत सं. √मण्ड् > ऋग्वेद √मृञ्ज् पासून व्युत्पादला असून मध्यंतरीं *मृज्ञे, *मृंक्षे, *मृंष्ठे या अवस्था कल्पिल्या आहेत आणि त्यांच्या मतें √मृष्ट् मधील -ष्ट् चें > *ण्ट्(ण्ठ्), > ण्ड् असे विकास होत गेले. सकृद्दर्शनीं हा विकास ठीक आहे. अडचण अेवढीच की या

विकासांत गृहीत धरलेला अनुनासिकानंतर अघोष वर्णाचा होणारा घोष (ण्ट् > ण्ड्) हा वायव्यप्रांतीय विशेष अशोकाच्या शासनांतसुद्धा आढळत नाही. अन्याओंमनी तो सूत्र-वाङ्मयासारख्या प्राचीनतर कालखंडांतील वाङ्मयांत आढळणाऱ्या √मण्ड् धातूचे व्युत्पत्तींत गृहीत धरला आहे. त्यापेक्षा मृद् >* मृन्द् > मण्ड् अधिक सयुक्तिक व प्रा. आ. भा.तील विकासांना धरून आहे.

प्रस्तुत अुदाहरण घेण्याचा मुख्य अुद्देश हा की चांगले चांगले भाषाकोविदसुद्धा स्थलकालीन विकास लक्षांत न घेतां निरनिराळ्या ग्रंथांतून संदर्भशून्य अुतरे, अुदाहरणें व साधर्म्ये दडपून वापरून व्युत्पत्तिशास्त्रांत मालेराओी माजवतात. तेव्हा मनुष्य कितीहि विद्वान असला तरी त्याने दिलेल्या विकासाच्या अवस्था ऐतिहासिक भाषाशास्त्राच्या कसावर घासून घेणें अगत्याचें आहे ही महत्त्वाची गोष्ट मला स्पष्ट करावयाची आहे.

आता म. सा. पत्रिकेच्या मागील अंकांतील 'कामगार' शब्दाच्या व्युत्पत्तीचा वाद घेअून ऐतिहासिक भाषाशास्त्राच्या दृष्टीने कसा विचार करतां येअील तो पाहूं. अर्धमागधींतील कर्तृवाचक– गार<सं.– कार आणि फारसींतील त्याच अर्थी– गार प्रत्यय यांच्या साम्या-मुळे हा वाद अुत्पन्न झाला. वस्तुस्थिति अशी आहे की भारतीय-आर्य व भारत-पारसीक (Indo-Iranian) भाषांचा अेक संबद्ध गट आहे. त्यामुळे प्राचीन फारसी भाषा व तिचा मध्ययुगीन विकास आणि प्रा. भा. आ. व तिचा विकास यांत पुष्कळच साम्य आहे. (Meillet-Benveniste-Grammaire du vieux Perse [2](Paris 1931), Reichelt Awesticher Elementarbuch (Heidelburg 1931 पाहा.) प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन काळांत आपण इराणशीं पुष्कळच भाषिक देवघेव केली आहे (अुदा० सं. पिक, पुस्तक, मिहिर अि० शब्द, प्राकृत-अपभ्रंशांतील असवार (स्वार), पाअीक्क (पाअीक), कुंदुरु (सुगंध) अि० शब्द आणि कै. माधवराव पटवर्धनांच्या फारसी-मराठी कोशांतील शब्द, तसेंच अितर व्याकरणविशेष— फारशी-मराठी कोश प्रस्ता० ११-२१ तुलनादर्शक– तर,– तरीन्, व –जाद,– गार,– मंद, अि० तद्धित् प्रत्यय वगैरे). मराठींत सं.– कार प्रत्ययांतील क् चा लोप होण्याची सामान्य प्रवृत्ति आहे; अुदा. लोहार, सोनार, कासार, चांभार अि० अर्थात् 'कामगार' मध्ये अर्धमागधी– गार प्रत्यय धरल्यास तो अपवाद समजला पाहिजे, व हा अप-वाद सिद्ध करतांना अर्धमागधीप्रांतांतून झालेली ही भाषिक अुसनवारी अुपर्युक्त शिलालेख व प्राकृत-अपभ्रंश वाङ्मयांत आढळते का याचा शोध घेतला पाहिजे. जर या वाङ्मयांत व यादवकालीन मराठींत न आढळतां ती अिस्लामी आक्रमणानंतरच आढळत असेल तर ही भाषिक अुसनवारी अर्धमागधी वाङ्मयानंतर महाराष्ट्रांत बोलभाषेंतच राहिली व फारशी –गार प्रत्ययास शिष्टमान्यता मिळाल्याबरोबर तत्सदृश या अर्धमागधी विशेषासहि मान्यता मिळून वाङ्मयनिबद्ध झाली असें म्हटलें पाहिजे. ऐतिहासिक भाषाशास्त्र कसें निर्णायक मत देअूं शकेल याचें अुदाहरण म्हणून ही चर्चा केली.

ऐतिहासिक भाषाशास्त्राच्या दृष्टीने संदर्भास लागणारें वाङ्मय— चिकित्सित संहिता, शब्देतिहासकोश, शब्दपर्यायशास्त्र (synonymics) अि०— अभावाने जाणवत असल्यामुळे या दृष्टीने व्युत्पत्तिसिद्धि करावी या जाणीवेपलीकडे पुष्कळांना कांही करतां येणार नाही याची मला कल्पना आहे. आणि याची तीव्र जाणीव व्हावी म्हणून सुमारे दोन वर्षांपूर्वी (अेप्रिल १९४२) मी याच पत्रिकेंतून 'मराठीच्या भाषिक अभ्यासाच्या कांही दिशा' हा लेख लिहिला.

त्यांत वर्णन केलेले संदर्भग्रंथ तयार होओीपर्यंत स्वस्थ न बसतां सामान्यतः मराठीचा स्थलकालीन विकास लक्षांत घेअून— निदान प्रा. भा. आ., म. भा. आ., अ.भा.आ. कालखण्डांचे निश्चित ठरलेले विशेष व भाषिक प्रवृत्ति न विसरतां— शब्दव्युत्पत्तींचे प्रयत्न व्हावेत. मराठी शब्दांतील (Vocables) संस्कृतला तत्सम, तद्भव व अर्धतत्सम अि० नात्यांनी संबद्ध शब्द, अिस्लामी व खिस्ती आक्रमणानंतर आलेले परदेशी शब्द फारसे त्रासदायक नसतात. अडचण मुख्यतः प्राकृत कालांत 'देशी' समजल्या गेलेल्या शब्दांची व व्यवहारांत नित्य अुपयोगांत असणाऱ्या वस्तुनामांची आणि क्रियापदांची येते. अशा वेळीं कांही पण्डित सर्व शब्द शक्यतों आर्यभाषांपासून सिद्ध करतात, तर कांहो द्राविडी भाषांकडे धाव घेतात, आणि वैयक्तिक मतें शास्त्रावर लादण्याच्या प्रयत्नांत फसतात अुदा० कॅल्डवेल प्रभृति पण्डितांनी अुपर्युक्त 'देशी' शब्द द्राविडी मानले आहेत. प्राकृत– अपभ्रंश ग्रंथांच्या संपादकांनी कांही शब्दांची व्युत्पत्ति स्पष्ट असली तरी ते हेमचंद्र धनपालांच्या देशी-शब्दकोशांत आहेत म्हणून त्यांस 'देशी'— अव्युत्पाद्य— म्हटलें आहे. पण हेमचंद्र-धनपालांचे 'देशी' शब्दकोशांतील अनेक शब्द व अर्वाचीन सम्पादकांनी 'देशी' किंवा 'अव्युत्पाद्य' समजले गेलेले बरेच शब्द प्राचीन भारतीय आर्यभाषांतील (अुदा० वेद-ब्राह्मण, सूत्रकालीन किंवा लौकिक संस्कृत) शब्दांपासून झाले आहेत असें आढळून येतें. कॅल्डवेलपंथीयांप्रमाणे द्राविडी भाषांकडे जाण्याचें कारण पडत नाही. तसेंच संस्कृतनेहि द्राविडी भाषांची अुसनवारी केली आहे हें अनेक पुराव्यांवरून सिद्ध होतें. त्यामुळे मराठी शब्दांचा संबंध नुसत्या प्राकृत किंवा द्राविडी शब्दांपर्यंत नेअून भागत नाही. डॉ. तुळपुळ्यांच्या 'यादवकालीन मराठी'च्या परीक्षणांत मीं म्हटल्याप्रमाणे मराठीने विशिष्ट विशेष द्राविडी भाषेपासून घेतला हें म्हणतांना तो आर्यभाषांचा अन्तर्गत विकास नाही आणि आर्यभाषांकडून तो विशेष द्राविडी भाषांनी अुचलून त्याला द्राविडी वळण मिळालें नसून तो शुद्ध द्राविडीच आहे असें सिद्ध झालें पाहिजे. अुदा० प्रा. भा. आ. भाषांतील मूर्धन्य वर्ण मुण्ड व द्राविडी भाषांची अुसनवारी समजतात. परंतु वेदभाषेंतील पुष्कळ अुदाहरणें ऋ, ॠ, किंवा ल् + दन्त्य = मूर्धन्य या समीकरणाने विवरितां येतात यावरून भारतीय-आर्यभाषांच्या अन्तर्गत विकासामुळे मूर्धन्य वर्ण अस्तित्वांत आले आणि मुण्ड व द्राविड भाषांच्या सहवासाने आर्यभाषांतील नैसर्गिक विकास अधिक जलद व निश्चित स्वरूपाचा झाला असें दिसतें. भा. आ. भाषांतून मूर्धन्य वर्णांची वाढ हळूहळू होत गेली आहे हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. दुसरें अुदाहरण 'अप्पा'= पिता याचें घेअूं. हें कानडीचें ऋण आपण घेतलें हें निश्चित. पण कानडीने सं. आत्मज = मुलगा- यावरून आत्मन् > प्रा. अप्प = बाप असा अर्थ करून म. भा. आ. मधून हा अुचलला. त्यामुळे आपल्याला कानडी 'अप्पा' या शब्दावर व्युत्पत्तिशास्त्राच्या दृष्टीने थांबता येणार नाही. याच्या अुलट ऋग्वेद किंवा अवेस्तांत विटांचे अुल्लेख असले तरी विटा पाडण्याच्या कलेसंबंधीचे किंवा धान्यमळणीसंबंधाचे आर्यभाषांतील शब्द अनार्य भाषांचें ऋण आहे असें आढळून आलें आहे.

'देशी' समजल्या जाणाऱ्या शब्दांत अनेक शब्द वैदिक किंवा लौकिक संस्कृतांत न आढळतां प्राचीनतम भारत-युरोपीय (Indo-European) भाषेंत आढळतात. अशा शब्दांचा तत्सदृश संस्कृत शब्दांशीं फार दूरचा संबंध असतो. अुदा० मराठी, हिंदी, गुजराथी, नेपाळी. घर < प्रा. घर > भा. यु. *gʷhoros 'घर'चा सं. 'गृह'शीं कांहीं संबंध नाही. मराठी काढणें, गुज. काढवुं, हिंदी काढना, पंजाबी कड्ढणा, नेपाळी काढ्नु < पाली, प्रा. कड्ढ < *कर्ध < भा. यु.* कल्धे (qaldhe) < भा.यु.*qale 'ओढणें.भा.यु. शब्दांच्या

युरोपियन विकासाशीं आपल्याला कांहींच कर्तव्य नाही. पण सं. कर्प् > कृष्ट > कड्ढ ही पिशल् वगैरेंची अुपपत्ति--ट्ट -> -ड्ढ या अशक्य विकासाच्या समजुतीवर आधारली असल्यामुळे अशास्त्रीय ठरली. हा दृष्टिकोण लक्षांत घेअून 'देशी' शब्दांचें संशोधन होअील तर बरें होअील.

जुन्या प्राकृतव्याकरणकारांकडून शरणागति स्वीकारून आजच्या भाषाशास्त्रज्ञांना आव्हान देणाऱ्या 'देशी' शब्दांच्या प्रश्नावर लिहावें तेवढें थोडें आहे. पण तो आजचा विषय नाही. मराठींत अुतरलेल्या देशी शब्दांच्या वंशजांचा विचार करतांना मुण्ड, द्राविड, भारत-युरोपीय व भारतीय आर्य भाषांचा संबंध येतो, व याचा अभ्यास करताना नुसत्या तौलनिक दृष्टीपेक्षा अैतिहासिक भाषाशास्त्राची पद्धत स्वीकारल्यास सत्यसंशोधनास अधिक मदत होअील. भाषाशास्त्र हा समाजशास्त्राचा भाग असल्यामुळे व आर्य-आर्येतरांच्या संस्कृतिसंगमाचें यथातथ्य आकलन होण्यास व्युत्पत्तिशास्त्राचें बहुमोल साहाय्य होत असल्यामुळे या शास्त्राचा पूर्वग्रह-रहित, शास्त्रशुद्ध अभ्यास व्हावा या अिच्छेने प्रस्तुत लेख लिखित आहे; कोणाचाहि अधिक्षेप करावा हा अुद्देश नाही.

प्रस्तुत लेख लिहितांना मला अनेक लेखांचा व पुस्तकांचा अुपयोग झाला. त्यांच्या लेखकांचा व विशेषतः डॉ. सु. मं. कत्रे यांनी आपल्या विल्सन फायलॉजिकल लेक्चर्सचें टंकमुद्रित (type script) दिलें याबद्दल त्यांचा मी फार आभारी आहे.

---

# हरिपंडितकृत भावबोधिनी

(श्री. चिं. नी. जोशी)

(ही भावबोधिनी भागवताच्या अेकादशस्कंधावरील समश्लोकी टीका आहे. लेखकास ती संशोधन करीत असतां मराठवाड्यांत परभणीजवळ गंगाखेड या गांवीं रा. रामराव वकील यांच्या येथ अुपलब्ध झाली )

**पोथीचें वर्णन :—** ही पोथी ९। अिंच लांब व ५। अिंच रुंद असून तिचीं अेकूण ३९ पृष्ठें आहेत. प्रत्येक पृष्ठांत ९ ओळी असून प्रत्येक ओळींत सुमारे २८।२९ अक्षरें आहेत. अक्षर सुवाच्य, वाटोळें व काळ्याभोर शाअीने काढलेलें आहे. पानाच्या सभोंवार अेक अिंच जागा सोडलेली आहे. पोथी शुद्ध असून तींत शोध कोठे कोठे केलेला आहे. कागद जाड, मळखोर, धुरकट व खरखरीत आहे. ह्या स्वरूपावरून हें हस्तलिखित सुमारें २०० वर्षांहून जुनें असावें असें वाटतें. पोथीच्या पहिल्या दोन पृष्ठांचा सुमारे २। अिंच रुंदीचा भाग जळल्या-सारखा दिसत आहे. जळलेल्या भागामुळे ३, ४, ५, १५, १६ व १७ ह्या प्रत्येक श्लोकां-तील सुमारें तीन तीन, चार चार अक्षरें नष्ट झालीं आहेत; तरी पण त्यायोगें फारशी अर्थहानि झालेली नाही.

**ग्रंथविषय व व्याप्ति:—** भागवताच्या अेकादशस्कंधावर ही समश्लोकी टीका आहे. ही टीका फक्त पहिल्या पांचच अध्यायांवर आहे. हरिपंडिताने सर्व अध्यायांवर टीका

अनुक्रमणिका

केली असली पाहिजे. पण नकलकाराने फक्त पंचाध्यायीच नकलून घेतली असून नक्कल संपूर्ण झाल्याचें लिहिलें आहे. त्याने "हरिपंडितकृतायां भावबोधिन्यां पंचमोध्यायः" ॥५॥ हस्ताक्षर जयरामभट शाहगडकर[1] लिखितं समाप्तं ॥ असा ग्रंथाचा शेवट केला आहे. हा शेरा हरिपंडिताच्या समश्लोकीच्या समाप्तीचा खास नाही. याचीं कारणें अशीं:—(१) मंगलाचरणांत तो म्हणतो—'बुद्धि भ्रमे महाग्रंथीं न्यूनपूर्ण पडेल जें। तें म्यां मजसवें विद्वज्जनाच्या अर्पिलें पदीं ॥१३॥ केवळ पंचाध्यायीसच त्याने महाग्रंथ म्हटलें नसतें. (२) केवळ पांचच अध्यायांवर त्याने रचना केली असली तरी त्याने प्रस्तावनेंत अथवा शेवटीं कारणें देऊन तसें खास सांगितलें असतें असें त्याच्या पद्धतीवरून दिसतें. (३) पांचव्या अध्यायाच्या अंतीं केवळ त्या अध्यायाची समाप्ति झाल्याचा निर्देश त्याने केला आहे; तो समग्र ग्रंथसमाप्तीचा सूचक नाही. (४) जसा त्याने ग्रंथारंभाचा काल मार्गशीर्ष मास व मन्मथ संवत्सर असा दिला आहे तसा ग्रंथसमाप्तीचा कालहि त्याने दिला असता. परंतु त्याचा उल्लेख तेथे नाही. ह्या सर्व कारणांवरून वरील अनुमानास चांगलीच बळकटी येते.

भागवताच्या दशमावर अनेक कवींनी मराठींत मोठमोठ्या टीका केल्या आहेत पण अेकादशावर मात्र अेकनाथांशिवाय दुसरा टीकाकार आज तरी अुपलब्ध नाही. महाराष्ट्रसारस्वतांत, कविचरित्रांत व संतकविकाव्यसूचींत अन्य टीकाकारांचा अुल्लेख नाही, व प्रस्तुत समश्लोकीचा तर नाहीच नाही. हरिपंडिताने मंगलाचरणांत जसा अेकनाथी भागवताचा अुल्लेख केला आहे तसा अन्य टीकांचा अुल्लेख-तशा पूर्वी असत्या तर-केला असता. यावरून आजपर्यंत अज्ञात असलेला हा ग्रंथ आजच प्रथम अुजेडांत येत आहे याविषयी संदेह नाही.

प्रस्तुत टीकेंत हरिपंडिताने आपली माहिती दिली आहे ती अशी:—(१) 'नरगुंदीं वास दाता। बुद्धि लक्ष्मीनृसिंह तो'. (२) जनक नरहरीतें माय लक्ष्मी तयेतें। ××× (नमन) करुनि भावें बंधु गंगाधरातें ॥ पटुमति हरिशर्मा श्रीनृसिंह (प्रसादें)। करि विशद अुपान्त्यस्कंध मापाप्रबंधें ॥४॥). म्हणजे या टीकेचा लेखक हरिपंडित हा नरगुंद (धारवाड जिल्हा) येथील राहणारा व नरहरी (नृसिंह) आणि लक्ष्मी यांचा पुत्र होता. वामनपंडितांच्या ग्रंथांत त्यांच्या नांवावर म्हणून 'भीष्मयुद्ध' नांवाचें अेक प्रकरण छापलें गेलें आहे. त्याच्या शेवटीं जो श्लोक आला आहे त्यावरून तें प्रकरण याच हरिपंडिताचें असावें असें वाटतें.

ताताभिधा नृहरिपंडित, माय लक्ष्मी। दे सर्वदा सुगुणयुक्त अुदार लक्ष्मी।
शांडिल्यगोत्र कुळदेव नृसिंह ज्याचा। दासानुदास निज वामन हो निजाचा ॥ (२१)
**दासानुदास हरि तो सकळा द्विजाचा** (भावे पाठ).

रा. भावे यांनी भीष्मशरपंजर आणि विराटपर्व हीं आणखी दोन प्रकरणें वामनी ग्रंथांतच आलेलीं भीष्मयुद्धकर्ता हरि याचीं असल्याचें म्हटलें आहे. पैकी पहिलें भीष्मशरपंजर हें प्रकरण काशीविश्वनाथपुत्र हरि दिक्षीत याचें आहे, व विराटपर्वांतील हरीचे किंवा वामनाचे, अुल्लेख देवतावाचक आहेत, व्यक्तिवाचक नाहीत. प्रस्तुत हरिपंडिताचीं भीष्मयुद्ध आणि भावबोधिनी समश्लोकी हीं दोन प्रकरणें असावींत.

गीतेवर वामनाची समश्लोकी टीका आहे. त्याने भागवतरामायणहि समश्लोकींत लिहिलें आहे. त्यांतहि अनुष्टुभ् श्लोकाचीच योजना त्याने केली आहे. ह्या ग्रंथावरूनच हरिपंडिताला प्रस्तुत समश्लोकी करण्याची स्फूर्ति झाली असावी. तो आरंभीं म्हणतो:—

---

१. शाहगड हें बीड जिल्ह्यांत आहे.

लक्ष्मीनृसिंहचरणद्वयसारसातें । सर्वार्थदायक असें समजोनि चित्तें ॥
त्यातें स्मरूनि करितो समपद्ययोग । अेकादशावरि यथामति सानुराग ॥
आपणांस स्फूर्ति कोणापासून मिळाली याच वर्णन त्याने पुढील पद्यांत केलें आहे:—
सच्चित्सुखात्मक सुखानिधि मध्यवासी । योगी, करी अभय चक्रपिनाक ज्यासी ॥
गौर त्रिनेत्र शिरिं शेष असे जयाला । स्फूर्तिप्रद प्रथम तो मनिं रेखियेला ॥

या ठिकाणीं साभिप्राय विशेषणांची मोठी खुबीदार योजना करून कवीने वामनपंडिता-पासून आपणांस प्रथम स्फूर्ति मिळाल्याचें सूचित केलें आहे. सच्चिदानंदपदांचें चिंतन करीत असतां वामनास सच्चिदानंदयतीने मलयाचलावर आकस्मिक दर्शन देअून गुरूपदेश दिला व कृतार्थ केलें ही गोष्ट वामनाच्या 'निगमसार' ग्रंथांतच निर्दिष्ट केली असल्याचें सुप्रसिद्ध आहे. राजाराम प्रासादीने आपल्या भक्तमंजरींत व सदानंदशिष्याने आपल्या अनुभवसारांत वामनाचें अुपनांव शेष व गोत्र वसिष्ठ असल्याचें सांगितलें आहे. या ठिकाणीं 'शिरिं शेष असे जयाला' ह्या श्लिष्ट पदाने कवीने वामन शेष याचें नांव सूचित केलें आहे असें वाटतें. हा अर्थ बरोबर असल्यास हरिपंडिताने आपला गुरु वामन असल्याचें येथे ध्वनित केलें आहे असें म्हणण्यास हरकत दिसत नाही. मात्र त्याने तें आपल्या मातापितरांच्या नांवाप्रमाणे स्पष्टपणें कां अुल्लेखिलें नाही ह्याचें आश्चर्य वाटतें.

आता आपण त्याच्या ग्रंथाच्या सामान्य स्वरूपाकडे वळूं. तो म्हणतो— श्रीहरीने मला ही रचना करावयास बळेंच लावलें आहे. अेकादशसिंधु तरावयास मी शक्त न. तथापि श्रीधरस्वामी (संस्कृत टीकाकार) मला सेतुहेतु असे. त्याच्या टीकेच्या साहाय्याने ही टीका मी करीत आहें. अेवढेंच नव्हे तर ॥ यथेष्ट बोलणें काय श्रीधराही अनुक्त जे । पदार्थशोध करितों त्यांचें शिष्यत्व पावुनी ॥ श्रीधरी टीकेंतही सुटलेल्या पदांचा अर्थ मी सांगेन. श्लोकार्थ सोडून स्वेच्छाचारी टीका ही ''कांत टाकूनियां स्वैरा विहरे पुंश्चली जशी'' असा त्याने अितर टीका-कारांस टोमणा मारला आहे. पण ते कोण असावे ह्याचा तर्क निदान आज तरी करतां येणें शक्य नाही. कारण अेकनाथाशिवाय अन्य मराठी टीकाकार अद्यापि अुपलब्ध नाहीं. कोणी संस्कृत टीकाकार अथवा अेकनाथच येथे लक्ष्य आहेत की काय हें समजत नाहीं. मात्र लगेच पुढील श्लोकांत त्याने जो अेकनाथी भागवताचा अुल्लेख केला आहे तो अुपहासात्मकच वाटतो. पाहा:— तयास हे समश्लोकी जे मूळ ग्रंथशोधक । बाळे भोळे तयां आहे । माअुली अेकनाथ तो ॥९॥ तसें असल्यास हा प्रहार जरा कठोरच खरा, आणि त्यांत विशेष मौज ही की आपली टीका फक्त चिकित्सक लोकांकरिताच आहे, भावड्या व मूर्ख लोकाकरिता नाही. त्यांना अेकनाथमाअुली आहेच असें म्हणून त्याने आपली आढ्यताहि मिरविली आहे.

नंतर त्याने आपली टीकापद्धति विशद केली आहे. तो म्हणतो— क्वचित् अुत्तानार्थ व प्रसिद्धार्थ पदें माझ्या टीकेंत गळलीं असलीं तरी 'तें दूपण न ठेवावें समश्लोकीस पंडितीं ॥१०॥ जाणे पंडित जो तोचि विद्वज्जनपरिश्रम । वेणा देतां कसें दुःख । वांजेला काय तें कळे ॥ असें मोठ्या ठसक्याने त्याने आत्मसमर्थन केलें आहे. पुढे तो म्हणतो— कोणी पंडित माझा ग्रंथ पाहून मला हसतील तर हसोत कारण 'अुपहास करो राजा । तेंच रंकाहि भूपण ॥१२॥ बुद्धि भ्रमे महाग्रंथीं न्यून पूर्ण पडेल जें । तें म्यां मजसवें विद्वज्जनांच्या अर्पिलें पदीं ॥१३॥ अशा ज्ञानेश्वरानुकारी शब्दांनी त्याने किंचित् विनयहि प्रकट केला आहे. पण प्रारंभींची अैट विसरून जेव्हा तो 'भावार्थ मात्र वदतों । प्रार्थना हे बुधांप्रति । पदार्थशोध करतां भापा हे बापुडी

किती ॥१४॥ असें म्हणूं लागतो व आपल्या न्यूनत्वाचें समर्थन मावेच्या न्यूनत्वानें करूं पहातो तेव्हा मात्र त्याचें हसूं आल्याशिवाय राहत नाही. आणि 'विस्मरंति हि पांडित्यं स्वकार्ये समुपस्थिते' ह्या सुभाषिताची आठवण होते.

ह्यानंतर कवीनें आपल्या समश्लोकीची रीति स्पष्ट केली आहे. ती अशी की समश्लोकी म्हटली की श्लोकास श्लोक व वृत्तास वृत्त अशी ती पाहिजे. आणि त्यानें ती तशीच केली आहे. वामनाप्रमाणे सर्वत्रच अनुष्टुभ् छंदच त्यानें योजिला नाही, तर मुळांतील भिन्न भिन्न वृत्तेंहि त्यानें त्या त्या ठिकाणीं घातली आहेत. पण कवि म्हणतो की वाचकास पूर्वापरसंगति व अितर कांही आवश्यक गोष्टी सांगणें अपरिहार्य असतें, म्हणून तसें करतांना अर्थातच कांही श्लोक अधिक झाले आहेत. पण ते अर्थबोधाच्या दृष्टीनें समश्लोकीस भूषणावहच असे वाटतील. कारण हिची प्रेरणा वासुदेव हरीनेच केली आहे. हिचें नांव 'मावबोधिनी' असें ठेविलें आहे.

ह्या ग्रंथाचा आरंभकाल त्याने पुढीलप्रमाणे सांगितला आहे—

ग्रंथारंभीं मार्गशीर्षे । मास मन्मथ (वत्सर!)
नरगुंदी वास दाता । बुद्धि लक्ष्मीनृसिंह तो ॥१७॥

ह्यावरून त्याने मार्गशीर्ष महिन्यांत मन्मथ संवत्सरांत ग्रंथारंभ केला होता. पण तिथि-वार त्याने दिलेला नाही. येथे ग्रंथारंभकाल त्याने दिला आहे तसा ग्रंथसमाप्तिकालहि त्याने पोथीच्या शेवटीं दिला असला पाहिजे. परंतु प्रस्तुत नक्कल केवळ पांच अध्यायांची असल्यामुळे तींत तो आला नाही हें साहजिकच आहे. नुसत्या संवत्सराच्या अुल्लेखावरून शकवर्ष काढतां येणें शक्य नाही. कारण प्रत्येक साठ वर्षांनी मन्मथ संवत्सर येणार. परंतु हा काल निश्चित करण्याचें आणखी अेक साधन अुपलब्ध आहे. तें हें की समश्लोकीचा पायंडा प्रथम वामनानें पाडला व त्याचेंच अनुकरण त्याचा शिष्य हरिपंडित यानें येथे केलें आहे. वामनाची समश्लोकी शके १५९५ च्या सुमारास झाल्याचें सर्वांस संमत आहे. तेव्हा हरिपंडिताची समश्लोकी शके १५९५ नंतरच्या मन्मथ संवत्सरांत झाली असली पाहिजे हें अुघड आहे. जंत्रीवरून हा शक १६३७ असा येतो. तोच काल या मावबोधिनीचा होय. दुसरें असें : नरगुंदींत वास करणारा नरसिंह हा माझा बुद्धिदाता आहे असें कवीनें सांगितलें आहे. तेव्हा कवीचें निवासस्थान खुद्द नरगुंदी ग्रामांतच अगर त्याच्या आसपासच असलें पाहिजे. मावे तर्क करतात त्याप्रमाणे तें वाअीजवळील धोम खास नव्हे.

येणेंप्रमाणे कवीनें आपल्यासंबंधी व आपल्या ग्रंथासंबंधी बरीच माहिती १७ श्लोकांच्या मंगलाचरणांत दिली आहे हा त्या पोथीचा मोठा विशेष होय. कारण सामान्यतः अशा गोष्टींत मराठी कवि मुग्धता स्वीकारीत असतात.

**ग्रंथपरिचय व परीक्षण**:— पूर्वी सांगितल्याप्रमाणे पहिल्या पांच अध्यायांवर ही समश्लोकी आहे. ह्यांत पुढील विषय आले आहेत :—

अ. १ भूभारहरणासाठीं यदुकुलाचा क्षय करण्याबद्दल श्रीकृष्णाचा संकल्प. ब्राह्मणशाप व कुलक्षयकारक मुसळाची अुत्पत्ति.
अ. २ वासुदेव नारदाला भागवतधर्म विचारतो. नारद त्याला नवयोग्यांचा व जनकाचा संवाद सांगतो.
अ. ३ मायालक्षण. तिच्या वारणाचे अुपाय. ब्रह्मलक्षण अि०
अ. ४ भगवंताच्या अवतारकथा. अभक्तांच्या गति.
अ. ५ युगपरत्वें भगवत्सेवाधर्म. श्रीकृष्णस्वरूपाचें यथार्थ वर्णन.

मुळांतील श्लोकसंख्या अनुक्रमें २४, ५५, ५५, २३ आणि ५२ अशी आहे. म्हणजे अेकंदर श्लोकसंख्या २०९ आहे. यांत मंगलाचरणाचे १७ व पूर्वापरसंगतीचे अनुक्रमें ९, २, १, १, १ म्हणजे १४, असे ३१ मिळविले की अेकंदर ग्रंथसंख्या २३९ होते.

यापुढे प्रत्येक अध्यायांतील अेक अेक श्लोक व त्यावरील समश्लोकी ही नमुन्याकरिता दिली आहे. ही निवड यदृच्छयाच पण भिन्नवृत्तानुसारच केली आहे.

अ. १ ला, श्लोक २४ :— भगवन् ज्ञातसर्वार्थ अीशोऽपि तदन्यथा ।
कर्तुं नैच्छद्विप्रशापं कालरूप्यन्वमोदत ॥२४॥
टीका :— समर्थ आणि सर्वज्ञ भगवंत तथापि रे ।
अन्यथा न करी विप्रशापातें मानिलें बरें ॥२४॥

अ. २ रा श्लोक ५५ :— विसृजति हृदयं न यस्य साक्षाद्धरिरवशाभिहितोऽप्यघौघनाशः
प्रणयरशनया धृतांघ्रिपद्मः स भवति भागवतप्रधान अुक्तः ।
टीकाः— अघहरि जो स्मरतो अनावडीने त्यजि हरि तोच न ज्याचिया मनातें ।
पदिं धरिला जगदीश भक्तिदोरे म्हणुनि म्हणें अतिवल्लभभक्त त्यातें ॥

अ. ३ रा श्लोक ३६ वाः— नैतन्मनो विशति वागुतचक्षुरात्मा ।
प्राणेंद्रियाणिच यथानलमार्चिषः स्वाः ॥
शब्दोऽपि बोधकनिषेधतयात्ममूलम् ।
अर्थोक्तमाह यदृते न निषेधसिद्धिः ॥३६॥
टीकाः— प्राणेंद्रियें सकलहीन पवेत ज्यातें । जैसा स्फुलिंगगण जेथुनि तो न त्यातें ।
जो आपणासहि निषेधुनि वेद बोधी । ते ब्रह्म ज्याविण घडे न निषेधसिद्धी ॥

अ. ४ था श्लो. २२ भूमेर्भरावतरणाय यदुष्वजन्मा । जातः करिष्यति सुरैरपि दुष्कराणि ।
वादैर्विमोहयति यज्ञकृतोऽतदर्हान् । शूद्रान्कलौ क्षितिभुजोन्यहनिष्यदन्ते ॥
टीकाः— वंशी सुरासहित होअिल यादवांच्या । कोटी वधील समरीं नृपदानवांच्या ।
निंदील बुद्ध हरि होअुनि यज्ञकर्में । म्लेच्छांस कल्कि हरि मारिल शूरधर्में ।

अ. ५ वा श्लो. ४२ स्वपादमूलं भजतः प्रियस्य त्यक्तान्यभावस्य हरिः परेशः
विकर्म यच्चोत्पतितं कथंचिद् धुनोति सर्वं हृदि संनिविष्टः ॥४२॥
टीकाः— श्रीपादपद्मास अनन्य जो भजे । नेणे हरीवांचुनि सर्वथा दुजें ।
राहे तयाच्या हृदयीं परेश तो । विकर्म कांहीं घडलें निवारि तो ॥४२॥

**ग्रंथसमाप्तिः**— अिति श्रीभागवते महापुराणे अेकादशस्कंधे नारदवसुदेवसंवादे जाये तयोपाख्याने पंचमोध्यायः । हरिपंडितकृतायां भावबोधिन्यां पंचमोध्यायः ॥
हस्ताक्षर जयरामभट शहागडकरलिखितं समाप्तम् ॥

आपल्या नांवाचा अुल्लेख हरिपंडित व हरिकवि असा कवीने केला आहे. त्याचें अुपनांव पंडित असावें कारण त्याने आपल्या पित्याचा अुल्लेख नृहरि पंडित असा केला आहे. जयरामभट शहागडकराने पंचाध्यायीच नकलून घेतलेली दिसते. लेखनसमाप्तिकाल दिलेला नाही. मराठी टीकेला त्याने भाषाप्रबंधटीका असें म्हटलें आहे वामनपंडित मूलोकभाषा असें मराठीस म्हणतो. ह्यानें आपणांस हरिकवि, पटुमति, हरिपंडित असें विशेषिलें आहे.

आता वरती जे अुतारे दिले आहेत त्यांचें निरीक्षण केलें असतां आपणांस कांही कांही पदें समश्लोकींत गळलेलीं आढळतात तर कांही संस्कृत पदें मराठींत जशींच्या तशीं केलेलीं दिसतात अुदा० कालरूपी ($\frac{1}{24}$); साक्षात् ($\frac{2}{55}$); नैतन्मनो अि० संबंध चरण ($\frac{3}{36}$), भूमे-

मोरावतरणाय, (सुरैरपि दुष्कराणि $\frac{४}{२३}$) हीं पदें गळलीं आहेत, तर निषिद्धासिद्धि, विक्रमं; शापव्याज वगैरे पदें तशींच ठेविलीं आहेत. पण समश्लोकीच्या बंधनांत असें होणें अपरिहार्य आहे. आणि ह्याच जाणिवेने कवीने पूर्वी सांगितल्याप्रमाणे मंगलाचरणांत आपली सोडवणूक करून घेतली असल्यामुळे दूषण ठेवण्यास जागा नाही. शिवाय तो म्हणतो—'भावार्थ मात्र वदतों प्रार्थना हे बुधांप्रति' ॥$\frac{१}{१४}$॥ तेव्हा असें छिद्रान्वेषण करणें अुचित नाही. अेकंदरींत ही समश्लोकी अत्यंत सरळ, सुबोध व सुरसहि झाली असून वामन पंडिताच्या समश्लोकीच्या तोडीची किंबहुना अनेकवृत्तात्मक असल्यामुळें तिजहून कांकणभर सरसच झाली आहे असें म्हणावेंसें वाटतें. वामनाच्या ग्रंथांत दिसणारें भाषाव्याकरणाचें वैशिष्ट्य ही यांत दिसतें अुदा० टुकडा, तां (त्वां); मक्तिदेरे, नयनें (त्र); अग्रसेने चूर्ण करवुनी सागरीं टाकवी असे प्रयोग, व 'सत्रयार्गी अुभे रेठा । कळे पाअुनिया भया ॥३.२४॥ असा क्वचितच येणारा कर्णकटु यतिभंगहि आढळतो. पण असे बारीकसारीक दोष गुणसन्निपातांत विलुप्त होतात. अेकंदरींत या आजपर्यंत अज्ञात राहिलेल्या ग्रंथाच्या प्राप्तीमुळे मराठी जुन्या पद्यवाङ्मयांत अेक बहुमोल भर पडली आहे असेंच सर्व विद्वान् व मार्मिक साहित्यिकांस वाटेल असा भरंवसा आहे.

---

## शुद्धलेखनमंडळास कांही सूचना

**१. प्रस्ताव** — कांही दिवसांपूर्वी प्रि. वै. का. राजवाडे यांनी शुद्धलेखनाचे नियमांविषयी विचारविनिमय करण्यासाठी आम्हांस बोलाविलें होतें. तेथे शुद्धलेखनमंडळाने केलेले नियम वाचून त्यांवर चर्चा करण्यांत आली. शुद्धलेखनमंडळांतील विद्वानांचें कार्य अभिनंदनास पात्र आहे. शुद्धलेखन हा विषय मराठीभाषकांच्या, त्यांतहि विशेषतः विद्यार्थी व लेखक ह्यांच्या, अुपयोगाचा आहे, व म्हणून त्याकडे विशेष लक्ष देणें अवश्य आहे. हें जाणून वरील मंडळाने दीर्घकाल परिश्रम करून हे नियम बनविले व प्रसिद्ध केले. त्यांचा अुपयोग काय व्हावयाचा तो विद्यार्थ्यांस व लेखकांस होत असेलच. तथापि नियम अधिक शास्त्रशुद्ध असावे, त्यांची भाषा नेमकी अिष्टार्थद्योतक असावी आणि तेणेंकरून त्यांचा अुपयोग वाढावा, अशा दृष्टीने बऱ्याच सूचना करण्यासारख्या आहेत असें आमच्या चर्चेत दिसून आलें. तूर्त त्यांतील कांही मोजक्या सूचना पुढे मांडीत आहों. त्यांचा शुद्धलेखनमंडळांतील पंडितांनी व या विषयाची आस्था बाळगणाऱ्या अितर विद्वज्जनांनी अगत्याने विचार करावा.

**२. सामान्य तत्त्वांतील संदिग्धता** — मंडळाने आपल्या पत्रकाच्या पहिल्या चौदा पृष्ठांत मंडळाचे कार्याचा त्रोटक वृत्तान्त देअून त्यांतच मुख्यत्वें शुद्धलेखनविषयक प्रमुख प्रश्नांचा अूहापोह केला आहे आणि पुढील ५ पृष्ठांत आपले निर्णय दिले आहेत. या निर्णयांत प्रथमस्थानींच पुढीलप्रमाणे सामान्य तत्त्व सांगितलें आहे. "केवळ अुच्चाराप्रमाणेच लेखन असावें हें तत्त्व ह्या मंडळास संमत नाही". वास्तविक मंडळास असेंच म्हणावयाचें आहे की, "लेखन शक्य तों अुच्चारानुसारीच असावें, मात्र त्यास व्युत्पत्ति, व्याकरण, अुपयुक्तता अित्यादिकांमुळे

क्वचित् थोडी मुरड घालावी लागेल अितकेंच." पण मंडळानें हें आपलें सामान्य तत्त्व अशा मार्पेत लिहिलें आहे की त्याचे खऱ्या हेतूच्या अगदी विरुद्ध अर्थ वाचकांचे मनांत प्रथम-दर्शनीं यावा. अशी संदिग्धता नसावी. 'अुच्चारतुल्य लेखन' ह्याच तत्त्वास मंडळ प्राधान्य देतें अशी स्पष्टता असावी अशी आमची सूचना आहे.

**३. अूहापोहाशीं विरोध**—मंडळाने आपल्या पत्रकाच्या पहिल्या १४ पृष्ठांत शुद्धलेखनविषयक मुख्य प्रश्नांचा जो अूहापोह केला आहे त्यांत पृष्ठें १३-१४ वर "तत्सम ऱ्हस्व अि-अु-कारान्त शब्द प्रथमेमध्ये दीर्घान्त अुच्चारण्याकडे मराठी बोलणारांची प्रवृत्ति असते" असेंच सांगितलें असून, संस्कृतामधील त्या शब्दांचें प्रथमेचें रूप विसर्गान्त असतें, त्या विसर्गाचा लोप होतांना त्या पूर्वीच्या स्वराला दीर्घत्व येणें तत्त्वतः क्रमानेच प्राप्त होतें, असेंहि सांगितलें आहे. या अूहापोहावरून पाहतां वास्तविक हे स्वर दीर्घ लिहावे असाच नियम पुढे यावा अशी अपेक्षा होते; पण नियम तसे नसल्याने ते ह्या अूहापोहाशीं विसंगत झाले आहेत.

**४. पंचमवर्णावरील अनुस्वार**—'न–सारख्या पंचम वर्णावरील अनुस्वार अुच्चारांत प्रतीत होत नाही म्हणून तो गाळावा' असें नियम १५ मध्ये सांगितलें आहे व लेखन अुच्चारानुसारी असावें या तत्त्वाप्रमाणे तें योग्यहि आहे. पण येथे अंगीकृत केलेल्या ह्या तत्त्वाचा भंग नियम ९ मध्ये आढळतो. या नियमांत मी हा शब्द तृतीया विभक्तींत असतां त्यावर अनुस्वार द्यावा असें सांगितलें आहे. (क) ने, नी ह्या प्रत्ययांतील अनुस्वार न ह्या पंचम वर्णामुळे जसा प्रतीत होत नाही तसाच **मीं** ह्यांतील अनुस्वारहि **म** ह्या पंचमवर्णामुळे प्रतीत होत नाही. प्रतीति न होणें व त्याचें कारण हीं अुभयत्र समान असतां अेका स्थळीं अनुस्वार गाळावयाचा आणि दुसऱ्या स्थळीं तो द्यावयाचा ही विसंगति नव्हे काय? (ख) नियम ४ मध्ये बोलणें-बोलणीं अशीं अनुस्वारान्त रूपें दिलीं आहेत. तींहि नियम १५ मधील वरील तत्त्वाच्या विरुद्ध आहेत. असा विसंवाद असणें योग्य नाही.

**५. अन्त्योपान्त्य अि-अु-वर्ण**—नियम २७ प्रमाणे कवी, गुरू हे शब्द ऱ्हस्वान्त लिहिणें प्राप्त होतें. पण हें अुच्चारास कितपत अनुकूल आहे? नियम २९ मध्येही वीप, गूण ह्या शब्दांतील प्रथमाक्षर ऱ्हस्व लिहावें असें सांगितलें आहे; तेंही अुच्चारास अनुकूल नाही. "रामास औषधाचा अजून **गूण** नाही. त्यामुळे तो वेळेस **वीपही** खाअील अशी शंका वाटते. या स्थितींत त्यास रक्षील तर हरीच रक्षील. त्याचे गुरूदेखील असेंच म्हणत होते." हीं वाक्यें कोणीही अुच्चारून पाहावीं आणि यांतील गूण, वीप, **हरी**, **गुरू** ह्या शब्दांतील, पहिल्या जोडींतील अुपान्त्य आणि दुसऱ्या जोडींतील अन्त्य अि-अु वर्ण ऱ्हस्व कीं दीर्घ अुच्चारले जातात हें सांगावें. सर्वांस त्यांचा दीर्घच अुच्चार प्रतीत होअील. ही गोष्ट गृहीत धरून आमची मंडळास अशी सूचना आहे की त्याने हे शब्द दीर्घ स्वरासह अुच्चारले जातील अशी नियमांत दुरुस्ती करावी; किंवा निदान तसा विकल्प तरी ठेवावा.

**६. क्रियाविशेषणीभूत विभक्तिरूपें**—नियम २५ सांगतो की विभक्तिप्रतिरूपक अव्ययांच्या शेवटीं अनुस्वार देऊं नये; मुळें अित्यादि शब्द निरनुस्वार लिहावे. यावर शंका अशी की (क) नियम १५ मध्ये त्राणें रामें अित्यादि अें प्रत्ययान्त शब्दांच्या अंतीं, (ख) तसेंच नियम १६ मध्ये सप्तमीच्या आं, ईं या प्रत्ययांवरही, अनुस्वार द्यावा असें सांगितलें

आहे. पण, हेच तृतीयान्त व सप्तम्यन्त शब्द अव्ययांप्रमाणे प्रयुक्त झाल्यास त्यांच्या अंतीं अनुस्वार देऊं नये' असें सांगण्यांत विसंगति नाही काय ? १ "वाड्याचे चौकांत कोपऱ्यांत वृंदावन आहे व मध्यें कारंजें आहे. २ "वाड्याचे चौकामध्यें कारंजें आहे." यांतील पहिल्या वाक्यांत मध्यें ह्या शब्दाचे अंतीं सप्तमी म्हणून अनुस्वार द्यावा आणि दुसऱ्या वाक्यांतील मध्यें ह्या शब्दाचे अंतीं अव्यय म्हणून देऊं नये असें मंडळकृत नियमांवरून प्राप्त होतें. मध्यें मुळें, द्वारें, हीं मूळचीं विभक्तिरूपें आहेत ही जाणीव अनुस्वार गाळल्याने नष्ट होईल. पण व्युत्पत्तीची जाणीव राखणें मंडळास इष्ट असल्याचें अनेक नियमांवरून व प्रारंभीं दिलेल्या सामान्य तत्त्वावरून दिसून येतें. म्हणून मंडळास सूचना अशी की तीच जाणीव येथेही ठेवून मंडळाने असले अनुस्वार पुनः स्वस्थानापन्न करावे, म्हणजे तेवढ्यापुरती तरी नियमांतील धरसोड टळेल.

**७. व्यंजनान्तांविषयीं मौन**— मंडळाच्या या पत्रकांत क्वचित्, आत्मसात्, अर्थात् असे व्यंजनान्त शब्द योजिले आहेत. पण **च** अव्यय पुढे आलें असतां **अर्थातच** याप्रमाणे व्यंजनान्ताचें अकारान्त रूप केलें आहे. तरी पण व्यंजनान्त रूप कोठे ठेवावें आणि तें स्वरान्त केव्हा करावें हें कोठेच स्पष्ट सांगितलें नाही. नाही म्हणावयास पृष्ठ १३ वर "संस्कृतांतील व्यंजनान्त शब्द मराठीमध्ये व्यंजनान्त कधीच राहत नाहीत" असें विधान केलें आहे. हें विधान जर खरें असेल तर या पत्रकांत क्वचित्, आत्मसात्, अर्थात् हे शब्द व्यंजनान्त कसे राहिले आहेत हें कोडेंच आहे. अेवंच ह्या महत्त्वाच्या प्रश्नाचा स्पष्ट निर्णय मंडळाने केलेला नाही हें मोठेंच व्यंग राहिलें आहे. (मंडळाच्या पत्रकांत पृ. १४ ओळ २५ येथे शीर्षबिंदूच असा दीर्घ अुकारान्त शब्द योजिला आहे. पण तत्सम शब्दांतील अन्त्य अुकार ऱ्हस्वाचा दीर्घ केव्हा होतो हें कोठेच सांगितलेलें नाही.)

**८. अेकाच शब्दाविषयी दोन भिन्न निर्णय :**— (क) 'ही' हें अव्यय नेहमी ऱ्हस्व लिहावें असें नियम ३४ मध्ये सांगितलें आहे. पण तें अुच्चाराच्या विरुद्ध आहे. "रामाबरोबर सीताच नव्हे तर लक्ष्मणही वनांत गेला." "मुलगा घरीं कामही करीना व शाळेंतही जाअीना" हीं वाक्यें अुच्चारून पाहावीं. आणि (ख) नियम १३ मध्ये 'अपि' पासून 'ही' होतें,— असें कांही ह्या शब्दाची व्युत्पत्ति देतांना सांगितलें असून, तेथे 'ही' ऱ्हस्व लिहिण्यास सांगितलें नाही. पण नियम ३४ मध्ये मात्र तोच (अपि पासून झालेला) ही ऱ्हस्व लिहिण्यास सांगितलें आहे. असा हा विसंवाद झाला आहे.

**९. व्यापकतेचा अभाव :**— विनंती शब्द दीर्घान्त लिहावा असा अेकाच शब्दापुरता ३६ वा नियम दिला आहे. नियम म्हटला म्हणजे त्यांत कांही व्यापक तत्त्व असावयास हवें. आणि तसें येथे आहेहि. विनंती हा कांही शुद्ध संस्कृत शब्द नव्हे, तो मराठी तद्भव शब्द आहे; व म्हणूनच 'मराठी शब्दांतील अन्त्योच्चारित अि-अु वर्ण दीर्घ असतो' ह्या सामान्य नियमाप्रमाणेच तो दीर्घान्त लिहावा लागतो. वपू, चक्षू, हळू, बहूत हे शब्दही असेच तद्भव आहेत. त्यांतील अुवर्णहि वरील नियमाप्रमाणेच दीर्घ होणार. म्हणून असल्या सर्व शब्दांचा समावेश होअील असा व्यापक नियम येथे असावयास हवा होता. पण बहूत ह्या शब्दांतील अुकार ऱ्हस्वच असावा अशी मंडळाची कल्पना असावी असा भास होतो; कारण या पत्रकांत पृष्ठ ९ ओळ ५ येथे बहुत असा ऱ्हस्व अुकारयुक्तच शब्द छापला आहे. तसेंच महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका अंक ६८ पृष्ठ २५६ येथेही तो बहुत असाच छापला आहे.

१०. **नियमानियमांतील विरोधः**— 'अर्थभेद होत नसेल तेथे व्युत्पत्तीने सिद्ध होत असले तरी ते अनुच्चारित अनुस्वार गाळावे' असें ८ व्या नियमांत सांगितलें आहे. येथे व्युत्पत्तीपेक्षा अुच्चारास अधिक महत्त्व दिलेलें आहे. अुच्चारांत नसलेला अनुस्वार देण्यास केवळ व्युत्पत्ति हें कारण पुरेसें नाही असा स्पष्ट अर्थ या नियमाचा होतो. असें असतां नियम १३ मध्ये **कांही** या शब्दांतील **का** वरील अनुस्वार अर्थभेदासाठीहि अपेक्षित नसतां केवळ तो व्युत्पत्तीने सिद्ध होतो म्हणूनच देण्यास सांगितलें आहे. अर्थात् हा आठव्या नियमाशीं अुघड विरोध आहे. असा विसंवाद नसावा.

११. **अनुसंधानाचा ताणः**— नियम २३ मध्ये प्रथमपुरुषी म्हणजेच **नास्मि** पासून झालेला '**नाही**' अनुस्वारान्त लिहावा आणि अितर-पुरुषी म्हणजे **नास्ति** वरून आलेला 'नाहीं' निरनुस्वार लिहावा असें सांगितलें आहे. येथेहि अनुस्वार देण्यास केवळ व्युत्पत्ति हेंच अेक कारण पुरेसें मानिलें आहे. यांतही नियम ८ शीं विरोध येतोच. शिवाय, हा अनुस्वार द्यावा की न द्यावा हें ठरवितांना लेखकास वाक्यांतील पदसंबंधाचें व व्युत्पत्तीचें अनुसंधान राखावें लागणार. 'मी प्रथमान्त असतां अनुस्वार देऊं नये आणि तृतीयान्त असतां द्यावा' हा नियम पाळतांनाही लेखकास असेंच प्रयोगाचें- व्याकरणाचें अनुसंधान राखावें लागणार. त्याचप्रमाणे अर्थभेद व्यक्त करण्यासाठी अनुस्वार द्यावा ह्या ७ व्या नियमानुसार अर्थभेद होतो की नाही हें ठरविण्यास मोठाच विचार करावा लागणार. अर्थभेद न होणारा म्हणून ८ व्या नियमाखाली अुदाहरणार्थ **सावळा** हा शब्द दिला आहे. तोच आपण विचारार्थ घेअूं. **सांवळी** (मूर्ति) आणि (सुपारीची) **सावळी** यांत अर्थभेद स्पष्ट आहे. तेव्हा **श्यामल** असा अर्थ असतां **सांवळी** असें अनुस्वारयुक्त लिहिलें पाहिजे असें ७ व्या नियमाप्रमाणेच प्राप्त होतें. सांवळी ह्या स्त्रीलिंगांत अनुस्वार आला की तो **सांवळा** ह्या पुल्लिंगांतही आलाच. व्युत्पत्तीने अनुस्वार येत असतांही त्याचा लोप करण्याकडे मराठीची प्रवृत्ति कशी आहे हें दाखविण्यासाठी मंडळाने आपल्या पत्रकांत पृष्ठ ११ वर जीं अुदाहरणें दिलीं आहेत त्यांत चाफा, कासार, लव व विसावा हे शब्द आहेत. चांफा = चंपक; चाफा = कानाची पाळ. (ख) कांसार = कांस्यकार; कासार = काचकार (बांगड्या भरणारा), कासार = तलाव. (ग) लंव = लोमन्; लव = अेक फळ; लव = रामाचा पुत्र. (घ) विसांवा = विश्राम; विसावा = अेक हिस्सा. हे शब्द सर्वत्र निरनुस्वार लिहावे असाच मंडळाचा अभिप्राय येथे दिसत आहे. अर्थात् ह्या स्थलीं व विशेषतः सावळा हें अुदाहरण देतांना मंडळासही अर्थभेदाचें अनुसंधान राहिलें नाही असें दिसून येतें. अेवंच, अशा स्थलीं अर्थांतर होतें की नाही हें ठरविणें फारच अवघड आहे. अेवढा अवघड विचार लेखकांनी लिहितांना करावा अशी अपेक्षा करणें अुचित होणार नाही.

१२. **मंडळास विनंतीः**— येथवर शुद्धलेखनपत्रकांतील मोजक्या ठळक मुद्यांचा विचार मांडलेला आहे. त्यांत हीच दृष्टि आहे की लेखन कोणत्या तरी अेका तर्कशुद्ध पद्धतीचें असावें, तें अेकविध व्हावें, आणि तें यावत्शक्य अुच्चारानुसारी असावें. मंडळाने ह्या सूचना विचारांत घ्याव्या अशी विनंती आहे.

पुणें<br>१८-१२-४३.

**गोविंद कृष्ण मोडक**<br>**यशवंत गणेश फफे**

वरील लेखांत शुद्धलेखनाचे नियमांसंबंधाने जे विचार मांडले आहेत व ज्या सूचना केल्या आहेत ते विचार व त्या सूचना निःसंशय लक्ष्यांत घेण्याजोग्या आहेत. विशेषेंकरुन

विद्यार्थ्यांचे मनावर शुद्धलेखनाच्या नियमांमुळे विशेष ताण पडणार नाही अशी तजवीज होणें अवश्य आहे. करिता तदनुसार मंडळाने या लेखाचा विचार करणें योग्य आहे.

वै. का. राजवाडे

(साहित्य-परिषदेने मान्य केलेल्या शुद्धलेखनाच्या नवीन नियमांना मिळावी तशी मान्यता अद्यापिहि मिळालेली नाही. शुद्धलेखनसमितीमधील सभासदसुद्धा सारेच या नियमांनुसार लेखन करीत नाहीत. श्री. मोडक आणि श्री. फके परिषदेच्या व्याकरणसमितीवर काम करीत आहेत. त्यांनी केलेल्या सूचना शुद्धलेखनसमितीच्या नियमांस धरून त्या नियमांमधील अुणीवा किंवा विसंगति काढून टाकाव्यात या दृष्टीनेच केलेल्या आहेत. समितीच्या नियमावलीप्रमाणे लेखन करणाऱ्यांनाहि साऱ्याच अडचणींचा निर्णय लावितां येत नाही. अशा बाबींचें तरी स्पष्टीकरण व्हावयास हवें असें वाटतें. म्हणून हा सूचनांचा लेख प्रसिद्ध करण्यांत येत आहे. बऱ्याच सूचनांचा भर अुच्चारानुसारी लेखन करणें या तत्त्वावर आहे. पण 'केवळ अुच्चाराप्रमाणे लेखन असावें हें तत्त्व ह्या मंडळास संमत नाही' असें मंडळाने म्हणून ठेवलेंच आहे. मंडळाच्या ह्या वाक्याचा अर्थ 'लेखन शक्य तों अुच्चारानुसारी असावें, मात्र त्यास व्युत्पत्ति, व्याकरण, अुपयुक्तता अित्यादिकांमुळे क्वचित् थोडी मुरड घालावी लागेल अितकेंच' असा आपल्या सोअीचा घेतां येअील काय याची शंका वाटते. तथापि सूचना विचारार्ह वाटत असल्याने त्यांना प्रसिद्धि देत आहों.—संपादक.)

---

## स्थायिभाव म्हणजे 'सेंटिमेंट'च

(डॉ. के. ना. वाटवे)

१

म. सा. पत्रिकेच्या आक्टोबर १९४३ (६८) अंकांत "स्थायिभाव म्हणजे सेंटिमेंट कां अिंस्टिंक्ट्?" हा विस्तृत लेख प्रो. दे. द. वाडेकर, अेम्.अे., (मानसशास्त्राध्यापक, फर्ग्युसन कॉलेज) यांनी प्रो. जोगांच्या व माझ्या विनंतीनुरूप लिहिला याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. त्यांतूनहि स्थायिभावांच्या मानसशास्त्रीय स्वरूपाबद्दल त्यांचा माझा मतभेद असतांनासुद्धा त्यांनी आपलें म्हणणें संयमाने— म्हणजे व्यक्तीपेक्षा शास्त्राकडे नजर देअून व निर्विकार पणें— मांडलें याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतों, व त्यावरील माझें म्हणणें त्याच पद्धतीने मांडतों.

रसास्वादकालीं रसिकाच्या अंतःकरणांत काव्यगत विभावादि सामग्रीने अभिव्यक्त होअून चर्वणेने रसत्व पावणाऱ्या मुख्य व स्थिर चित्तवृत्तींना 'स्थायिभाव' अशी संज्ञा आहे. रससामग्रीचें विवेचन करीत असतां मीं या स्थायिभावांचें साम्य आधुनिक मानसशास्त्रोक्त Sentiments शीं दाखविलें आहे (रसविमर्श पृ. ११३ ते १२३). प्रो. वाडेकरांच्या मतें

'स्थायिभावां'चें साम्य Instincts शीं आहे, व तें त्यांनी उपर्युक्त लेखांत सप्रमाण व सप्रपंच दाखविलें आहे. त्याच्याच युक्तायुक्ततेचा विचार आता करावयाचा. प्रस्तुत वाद दोन शास्त्रीय वस्तूंच्या (Entities) साम्यवैषम्याबाबत असल्याने त्यांत पुढील नियम उभयपक्षीं संमत व्हावा असें वाटतें. "ज्या दोन वस्तूंमधील साम्याची किंवा वैषम्याची चर्चा करावयाची असेल त्या वस्तूंचीं मूळ स्वरूपें प्रथम यथाशास्त्र व पूर्णत्वाने मांडावीं व तीं उभयपक्षीं मान्य झाल्यावर त्यांमधील साम्यवैषम्यदिग्दर्शन व्हावें म्हणजे निर्णय सुलभ होईल." प्रस्तुत प्रकरणीं Instincts व Sentiments यांचीं प्रो. वाडिकर यांनी आपल्या लेखांत उद्धृत केलेलीं ग्रंथोक्त स्वरूपें यथाशास्त्र असून तीं मला मान्य आहेत. पण त्यांनी मांडलेलें स्थायिभावांचें स्वरूप मात्र अपुरें आहे. 'रसविमर्श'तील रससामग्रीच्या परिशिष्टांत (पृष्ठ १३६–१३८) मीं उद्धृत केलेल्या मूळ संस्कृत वचनाधारेंच प्रो. वाडिकरांनी आपलें स्थायिभावविषयक मत मांडलें आहे हें खरें. पण वरील ठिकाणीं मीं उद्धृत केलेलीं लक्षणवचनें स्थायिभावांचें भावांमधील स्थान व त्यांच्यामधील असलेलें त्यांचें नातें व वैलक्षण्य एवढेंच दाखविणारीं प्रायः आहेत. त्यांच्या जोडीला 'रसप्रक्रिये'त स्पष्ट केलेलें रसास्वादकालीन स्थायिभावांचें रूपहि जमेस धरलें पाहिजे. म्हणजेच स्थायिभावांचा विचार पुरा होईल. ही गोष्ट प्रो. वाडिकरांनी साकल्याने केली नसल्यामुळे त्यांची स्थायिभावविषयक मांडणी अपुरी राहिली व म्हणूनच त्यांच्या निर्णयाची दिशा बदलली. यासाठीं येथे प्रथमच स्थायिभावांचें यथाशास्त्र रूप थोडक्यांत पण स्पष्ट आणि साधार मांडणें आवश्यक आहे.

२

स्थायिभाव ही वरून दिसावयास एकच वस्तु असली तरी तिला दोन वेगवेगळालीं रूपें आहेत, व तीं संस्कृत साहित्यशास्त्रांत स्पष्टपणें मांडलेलीं आहेत: (१) सूक्ष्म व निगूढ वासनारूप व (२) अभिव्यक्त व प्रकट भावरूप. 'सामाजिकाच्या (रसिकांच्या) मनांत सुप्तवासनारूपाने आगाऊच असलेला स्थायी साधारणीकृत विभावादींनी व्यक्त होऊन रसत्व पावतो असें रसप्रक्रियेचें वर्णन अभिनवगुप्ताचार्य, मम्मट, जगन्नाथ इत्यादि सर्व प्रमुख शास्त्रकारांनी केलें आहे. अभिनवगुप्ताचार्य तर कोणत्याहि उपजलेल्या प्राण्याच्या ठिकाणीं ही सूक्ष्म वासना असते असा सामान्य सिद्धान्त ठामपणें सांगतात. स्थायी व व्यभिचारी या भावांचें वैलक्षण्य सांगतांनासुद्धा स्थायी भावांच्या या निगूढ वासनारूपत्वाचाच आधार घेतलेला असतो. म्हणजे स्थायी भाव हे वासनारूप असल्याने त्या रूपांत चित्तांत कायमचे स्थिर असतात तर व्यभिचारी भाव असे वासनारूप नसल्याने स्वविभावांचा लोप झाल्यावर नाश पावतात. हें झालें स्थायी भावांचें पहिलें निगूढ वासनारूप. ही मानवाची निसर्गदत्त व निगूढ मनोरचना (Innate structure) होय. पण ही रचना विभावादींनी प्रबुद्ध होऊन कार्यप्रवण (functioning) झाली की तिला येणारें प्रकट रूप म्हणजेच भाव होत. का. प्र. ४ येथील 'वासनात्मना स्थितः

१ अत एव सर्वसामाजिकानामेकघनतैव प्रतिपत्तेः सुतरां रसपरिपोषाय, सर्वेषामनादिवासनाचित्रीकृतचेतसां वासनासंवादात्। (अ० भा० पृ. २८१) २ सामाजिकानां वासनात्मतया स्थितः स्थायी रत्यादिकः। (का० प्र० ४ पृ. ९२). ३ प्राग्विनिविष्टवासनारूपो रत्यादिरेव रसः। (र० गं० पृ. २२). ४ न हि एतच्चित्तवृत्तिवासनाशून्यः प्राणी भवति। (अ० भा० पृ. २८४) जात एव हि जन्तुरियतीभिः संविद्भिः परीतो भवति। (अ० भा० पृ. २८४). ५ (व्यभिचारिणः) हेतुप्रक्षये क्षीयमाणाः संस्कारशेषतां नावश्यमनुबध्नन्ति। (अ० भा० पृ. २८४)

स्थायी' यावर व्याख्यान करतांना झळकीकरांनी ही गोष्ट स्पष्टच सांगितली आहे. "पूर्वी सूक्ष्म वासनारूपाने असलेला स्थायी आता विभावादींनी आविर्भूत होतो व भाव बनतो." 'भाव म्हणजे रसानुकूल चित्तविकार' किंवा 'निर्विकार चित्तांतील पहिला बदल म्हणजे भाव' अशीं भावांचीं लक्षणें वरील गोष्टीला अनुसरूनच आहेत.

याचा निष्कर्ष असा की निगूढ वासना जन्मान्तरानुस्यूत असल्याने सहजात आहेत पण त्या बाह्य विषयसंनिकर्षाने प्रकट झाल्या की त्यांना भावरूप प्राप्त होतें व त्यांचा मानवाच्या अनुभवाशीं संबंध येऊं लागतो व तदनुरोधाने त्यांचे पुढील विकास व संघटना बनूं लागतात. हा भेद दाखविण्यासाठीच निगूढ वासनेला वासना, संस्कार, भावना अित्यादि पर्याय देऊन स्थायी भावांचें मूळ स्वरूप सांगितलें आहे तर 'स्थायिभाव' किंवा 'प्रकट वासना' या शब्दांनी त्या मूळ रूपांचा प्रकट व अनुभवसंबद्ध भाग वर्णिलेला आहे. स्थायींचें हें अुभयरूपनिष्ठ स्वरूप अनेक ग्रंथकारांनी स्पष्टपणें सांगितलेलें आहे. "वासनारूपत्व असलें तरी (भावरूपाने) वरचेवर प्रकट होणें हेंच स्थायिभावांचें लक्षण होय" असें 'साहित्यसार'कर्ते अच्युतराय म्हणतात. वासना हा शब्द स्थायी भावांस वापरावयाचाच असल्यास त्यांच्या पहिल्या रूपास निगूढवासनारूप म्हणावें व दुसऱ्यास प्रकटवासनारूप म्हणावें. या दुसऱ्यासच विशेषतः स्थायिभाव म्हणतात. कारण स्थायी भाव म्हणून रति, हास, शोक, क्रोध, भय, विस्मय अित्यादि जे चित्तवृत्तिविशेष दिलेले आहेत ते वासनांच्या प्रकट व कार्यप्रवण रूपांचे स्पष्ट निदर्शक आहेत. त्यांच्या विवरणांत जगन्नाथ, विश्वनाथ वगैरे ग्रंथकार 'चित्तविकासाख्यो हासः' 'प्रज्वलनाख्यः क्रोधः', 'विस्फाराख्यो विस्मयः' अित्यादि कार्यव्यापारांचे (functional aspect) बोधक शब्द वापरतात. वासनेचीं हीं दोन रूपें निगूढत्व व प्रकटता किंवा कार्यव्यापृति या बाबतींतच परस्परभिन्न असतात असें नाही. त्यांतील दुसऱ्या रूपांत अनुभवसंपादनाचाहि भाग असतो ही फार महत्त्वाची गोष्ट विश्वनाथाने स्पष्टपणें मांडलेली आहे. तो म्हणतो, "रति आदिकरून वासनांवाचून रसास्वाद घडत नाही." यांतील 'वासना' शब्दाची फोड तो वासनांचीं दोन रूपें कल्पून पुढीलप्रमाणे करतो– 'रसिकांचे ठायीं या जन्मींची (अिदानींतनी) व पूर्वजन्मींची (प्राक्तनी) अशा दोन वासना असतात. त्या दोन्हीहि काव्यास्वादनास कारणीभूत आहेत. जर (या जन्मीं संपादिलेली) पहिली वासना नसेल तर (विषयविमुख व वेदाभ्यासजड) ब्राह्मण आणि वृद्ध मीमांसक अित्यादींना सुद्धा रसास्वाद घडला असता. (पण तो घडलेला दिसत नाही.)[२] धर्मदत्ताने तर असें म्हटलें आहे की, निर्वासन लोक नाट्यगृहांत अेखाद्या खांबासारखे, भिंतीसारखे किंवा दगडासारखे निर्विकार राहतात[३].

---

६ संस्काररूपेण (सूक्ष्मतया) स्थितः (पूर्वमेवास्थितः) अधुना तु साधारणीकृतो विभावादिभिः तस्यैव आविर्भावमात्रम् अिति भावः। (का० प्र० ४ पृ ९२). ७ रसानुकूलो विकारो भावः। (र०त०). ८ निर्विकारस्य चित्तस्य भाव स्यादादिविक्रिया। (र० सु० १.१९२).

१ स्थायित्वं वासनात्वेऽपि मुहुर्व्यक्तित्वमिष्यताम् (सा० सा० ४-५०). त्यावरील टीका "तस्मात् मुहुः प्रकटवासनाविषयत्वं स्थायित्वमिति तल्लक्षणं फलितम्। निगूढसंस्कारादौ तद्वारणाय प्रकटमिति। तसेंच (सं० र० ७.१४७०); (र० गं० पृ० ३०-३१); व (सा० द० ३.१७४ टीका) पाहा.

२ न जायते तदास्वादो विना रत्यादिवासनाम्। वासना चेदानींतनी प्राक्तनी च रसास्वादहेतुः। तत्र यदि आद्या न स्यात्तदा श्रोत्रियजरन्मीमांसकादीनामपि सः स्यात्। (सा० द० ३.९)

३ निर्वासनास्तु रङ्गान्तः काष्ठकुड्याश्मसंनिभाः।

या विश्वनाथाच्या म्हणण्याचा अभिप्राय असा आहे– "जन्माला आलेल्या मानवाला रति, हास, क्रोध, भय अित्यादि सूक्ष्म वासना कमीअधिक प्रमाणांत असतातच; पण तेवढ्यानेच काव्यास्वादाचें काम होत नाही. तर त्या सहजात वासनाबीजांना बाह्यपदार्थदर्शनानें अंकुर फुटावे लागतात. माता, स्त्री, सुत, शत्रु, मित्र अित्यादि व्यक्तींनी व शब्द, स्पर्श, रूप अित्यादि अिंद्रिय पदार्थांनी सूक्ष्म वासना अंकुरित होअून त्या वाढीस लागाव्या लागतात. त्यामुळे निरनिराळे भाव व भावबंध निर्माण होअून राजा, शत्रु, मित्र, स्त्री व पुत्र अित्यादींबद्दल त्यांच्या मनांत अनुक्रमें आदर, द्वेष, स्नेह, काम व वत्सलता अित्यादि भावांच्या संघटना बनाव्या लागतात. याप्रमाणें रसिकाच्या जीवनांतील अनुभवाने फुललेली वासना म्हणजेच 'अिदानींतनी' वासना होय. हिची जोड असल्यावाचून काव्यास्वाद घडत नाही. पण मुमुक्षु, विरागी व शास्त्रचिंतक यांना निगूढ वासना असल्या तरी वेदाभ्यास, योगाभ्यास, शास्त्रचिंतन अित्यादि मार्गांनी त्यांचा ते निरोध करतात. म्हणजेच आपल्या चित्तवृत्तींना अिंद्रियार्थांपासून अलिप्त ठेअून 'अिदानींतनी' वासना चेतवीत नाहीत. श्रोत्रिय व म्हातारे मीमांसक यांचेंहि थोड्या वेगळ्या कारणाने का असेना असेंच होतें. यालाच चित्तवृत्तिनिरोध, वासनाक्षय किंवा तृष्णाक्षय व अरसिकता अशीं नांवें आहेत. या सर्व लोकांचे ठायीं 'अिदानींतनी' वासना विकसित न झाल्यामुळे 'त्रैगुण्योद्भव' व 'नानारस' असें लोकचरित त्यांना रुचत नाही व त्यावर आधारलेलें काव्य तर नीट कळत तरी नाही किंवा हृद्य तरी वाटत नाही. यासाठी असे लोक काव्यास्वादास अपात्र होत." यावरून दिसून येअील की निगूढ वासनेचा हा प्रकट, भावरूप व अनुभवसंपादित भागच 'स्थायिभाव' या संज्ञेला विशेष पात्र आहे, व तोच रसोत्पत्तीला मुख्यत्वेंकरून व साक्षात् कारणीभूत असतो. अनादि व सहजात वासना परंपरया या प्रकट स्थायिभावांच्या बुडाशीं पायाभूत असते म्हणून ते स्थिर व अविनाशी असें प्रतिपादण्यांत येतें तें मूळ घटनादृष्ट्या योग्यच होय. म्हणूनच असेंहि म्हणतां येअील की या अनादि वासनेचा हा प्रकट भाग जसा अनुभवसंपादित तसाच व त्याच कारणासाठी तो विकासशील, कालान्तराने घनविरल होणारा, व क्वचित प्रसंगीं विनाशीसुद्धा आहे. कारण वर दर्शविल्याप्रमाणे प्रकट वासनांची कमीअधिक वाढ कांहींना करतां येते, अजिबात थांबवितां येते व क्वचित् नष्टहि करतां येते. स्थितप्रज्ञ तर 'वीतरागभयक्रोध' असल्याचें सांगितलें आहे (गीता २.५६). साधी संसारी माणसेंसुद्धा अेखाद्या व्यक्तीवरील रति किंवा क्रोध विरुद्ध अनुभवाने समूळ नाहीसा करूं शकतात किंवा नसलेला संपादूं शकतात. पण नेहमीच्या साध्या व काव्याच्या व्यवहारांतहि 'इदानींतनी' वासनेची बनणारी संघटना इतर साध्या भावांपेक्षां फारच पक्की असते हें विसरून चालणार नाही. हे रसिकगत अलौकिक स्थायी भाव जसे वर्णिले आहेत तसेच पात्रगत लौकिक स्थायिभावसुद्धा संस्कृतांत अुल्लेखिलेले असतात हेंहि ध्यानांत घेण्यासारखें आहे (भ. म. र. ३.४, नाट्यदर्पण पृ. १५८, सा. द. ३.२८-२९ पाहा).

## ३

स्थायिभाव हा सूक्ष्म वासनेंतून अुत्पन्न झालेला अनुभवसंपादित भाग आहे याला आणखी एक दोन आधार आहेत. 'वासनेंतून किंवा वासनेनें निष्पन्न झालेला' असें स्थायीचें वर्णन 'अभिन्नोऽपि स प्रमात्रा वासनोपनीतरत्याद्रितादात्म्येन गोचरीकृतः' या सा. दर्पणोक्त मतांत (सा. द. ३, पृ. ९०) केलें आहे. मधुसूदनसरस्वती आपल्या भक्तिरसायनांत (१.४ ते १०) स्थायिभावांची पुढील व्याख्या देतात– प्रथम चित्त हें लाखेसारखें कठिन असतें.

त्याचा बाह्य विषयांशीं संबंध आला की तेथें अुत्पन्न झालेल्या काम, क्रोध, भय, स्नेह, दया अित्यादि तापक भावनांनी तें विरघळतें. मग त्यांत त्या बाह्य वस्तूंचा आकार पडतो. यालाच म्हणतात भाव, व तोच त्या चित्ताच्या कठिन व पुन्हा द्रुत अवस्थेंतहि पक्का झाला की त्या वस्त्वाकाराला स्थायिभाव अशी संज्ञा प्राप्त होते.' मानवाच्या अनुभवांतील वस्तूंनी प्रबुद्ध झालेल्या मनांत त्या वस्तूच्या मानसप्रतिमा पडतात व त्यांभोवती पक्की भावसंघटना बनते येवढाच यांतील भाग आपल्यास येथे घ्यावयाचा आहे (रसविमर्श पृ. १६०).

या स्थायिभावांच्या स्वरूपावर आणखी अेका बाजूने प्रकाश पडतो. ती बाजू म्हणजे स्थायी व व्यभिचारी यांचे परस्परसंबंध. व्यभिचारी भावांना स्थायीसारखें स्वतंत्र वासनारूप नाही (अ. भा. पृ. २८४). सागरांतून जशा लाटा निर्माण व्हाव्या व त्यांतच पुन्हा विलीन व्हाव्या त्याप्रमाणे ते स्थायी भावांतून निर्माण होतात व त्यांतच विलीन होतात (सा. द. ३.१४० व द. रू. ४.७). ते स्थायी भावाच्या मानाने दुय्यम व दुर्बल आहेत (ना. शा. ७.१२) ते आपल्या धर्मांचें अर्पण स्थायी भावांना करतात (काव्यानुशासन पृ. ८६) व सूत्रांत फुलें ओवावीं तसे गुंफले जातात (अ. भा. पृ. २९४). हे अनेक स्थायी भावांभोवतीं जमतात व निरनिराळ्या रसांत संचार करतात (र. प्र. पृ. १७). हे स्थायी-भावांचें अुद्दीपन करण्यासाठी येतात व तें काम झालें की जातात (र. त. पृ. १८). व्यभि-चारी भावांचें वरील वर्णन कार्यरूप व कारणरूप अशा त्यांच्या अुभयरूपांचें आहे. त्यांपैकी कार्यरूपांत ते रसिकाच्या स्थायी भावापासून निष्पन्न होतात अेवढा भाग आपणांस येथे अभि-प्रेत आहे. म्हणजे स्थायी भावांना व्यभिचारीसारख्या भावांचें अुत्पादन करण्याचा धर्म असतो. व्यभिचारी भावांच्या यादींत कांही जातिवंत व्यभिचारी भाव, कांही प्रसंगपरत्वें स्थायी भावांचे बनलेले व्यभिचारी भाव व कांही शारीरिक अवस्था अशी गल्लत करण्यांत आली आहे. पैकी ज्या खऱ्या स्थायिभावोत्पन्न व्यभिचारी भावांबद्दल आपण वरील विधान केलें ते औत्सुक्य, दैन्य, विषाद, हर्ष, आनंद (धृति), चिंता व निर्वेद (खिन्नता) हे होत. स्थायी भावांचें संस्कृतसाहित्यशास्त्रोक्त स्वरूप हें असें आहे.

वरील स्वरूप सूक्ष्मपणें वाचीत असतां कोणाहि मानसशास्त्राभ्यासकाला (विशेषतः Hormic Psychology च्या अभ्यासकाला) मानसशास्त्रांतील कित्येक वस्तु (Entities) संस्कृत साहित्यशास्त्रांतील वस्तूंशीं समान आहेत असें दिसून येअील. जुन्या काळीं प्रतिपादि-लेल्या मनोव्यापारांत आजच्याअितकें शास्त्रीय व रेखीव स्वरूप असणें संभवनीय नाही हो गोष्ट लक्षांत घेअूनच हें साम्य मनाशीं निश्चित केलें पाहिजे. तें साम्य पुढीलप्रमाणे होअील– सूक्ष्म अनादि वासना म्हणजे Instincts किंवा Propensities; प्रकट अनुभवसंपादित इदानींतनी (स्थायी भाव) म्हणजे Sentiments; स्थायी भावांतून निष्पन्न होणारे व्यभिचारी भाव म्हणजेच वासना; Sentimentsचे व्यापार चालू असतांना त्यांतून अुदित झालेली Derived emotions. भाव म्हणजे सर्वसामान्य कोणतीहि Emotions; अनुभाव म्हणजे Expressions of the emotion व विभाव म्हणजे Aesthetic Excitants (objects). भरताने अेकूण अेकूणपन्नास भावांची यादी दिलेली आहे व त्यांत स्थायी भाव हे सर्वश्रेष्ठ, स्थिर, स्वामी, सेव्य अित्यादि असतात असें सांगितलेलें आहे. येथील श्रेष्ठकनिष्ठचर्चा सूक्ष्म अनादि वासना व अितर भाव यांच्यामधील नसून स्थायी भाव व अितर भाव यांच्यामधील आहे हें मुद्दाम लक्षांत ठेवावें. याचाच अर्थ असा की Sentiment ही मनोघटना Emotions, Derived emotions

वगैरेपेक्षा प्रभावी व टिकाऊ आहे. Instinct किंवा Propensity यांची श्रेष्ठता सांगण्याचें येथे प्रयोजनच नाही.

४

'स्थायी भाव म्हणजे Instincts' हा पक्ष मांडतांना प्रो. वाडेकरांनी Sentiment पक्षावर घेतलेले अेकेक आक्षेप आता आपण क्रमाने पाहूं व त्यांचें परीक्षण करूं. प्रो. वाडेकर म्हणतात— १ "स्थायी भाव सहजात आहेत व Sentiments स्वार्जित किंवा अनुभवसंपादित आहेत तेव्हा त्यांचें साम्य कसें संभवणार!" यावर अुत्तर असें की स्थायी भाव हे अनादि वासनारूपांत सहजात असले तरी अिदानींतनी वासनारूपांत अनुभवसंपादितच आहेत व अिदानींतनी वासनेला प्राक्तनी वासना जशी पायाभूत असते तसा Sentiments नाहि Instincts चा परंपरया मूलाधार आहे. २ ते म्हणतात, "Sentiments हे मानसिक अवस्था नव्हेत तर मनोरचनेंतील संस्काररूप घटक आहेत" (पृ. २६०). वरील गोष्ट मान्य करून असें विचारतां येअील की प्रो. वाडेकरांनी ज्या Instincts शीं स्थायी भावांचें साम्य कल्पिलें आहे त्या तरी कोठे मानसिक अवस्था आहेत? त्या सुद्धा सहजात व प्रवृत्तिसंस्काररूपच आहेत. त्यामुळे त्या प्रबुद्ध होअून व्यापारोन्मुख झाल्या म्हणजेच त्यांना जशी भावनात्मकता येते त्याप्रमाणे Sentiments हेहि संस्काररूपी घटक असले तरी विषयसन्निकर्षाने ते जागृत होतात व त्यांस भावनात्मकता (Affective aspect) येते. तात्पर्य, दोहोंनाहि घटनात्मक (structural) व व्यापारात्मक (functional) स्वरूपें आहेत. नेहमी सुप्त अवस्थेंत असणें, विषयसन्निकर्षाने जागृत होणें, भावनात्म बनणें व संनिकर्ष यांबला की पुन्हा सुप्त होणें हे धर्म दोहोंनाहि समान आहेत. म्हणून प्रो. वाडेकरांनी सांगितलेली वरील अडचण असलीच तर ती अुभयपक्षीं समान असल्याने अुपेक्ष्य होय. ३ प्रो. वाडेकर पुन्हा म्हणतात, "त्यांचें (Sentiments) स्वरूप वासनिक (Conative) नव्हे तर भावात्म किंवा भावात्मक आहे. पण स्थायिभाव मात्र वासनिक किंवा प्रेरणिक आहेत" (पृ. २६१). संस्कृत स्थायिभाव वासनिक किंवा प्रेरणिक (conative) आहेत की नाहीत ही गोष्ट संस्कृत ग्रंथकार सांगत नाहीत. आधुनिक मानसशास्त्राप्रमाणे स्थायिभाव सूक्ष्म वासनारूपांत प्रेरणिक असणें शक्य आहे असें म्हणतां येअील. पण संस्कृत ग्रंथकार याबद्दल मुग्धता स्वीकारतात कारण काव्यास्वादकालीं स्थायिभावांच्या प्रेरणिकतेची फारशी जरूरी नसते (रसविमर्श पृ. १७० पाहा). प्रो. वाडेकरांच्या वरील विधानांतील अेक भाग अशा रीतीने गैरलागू आहे व दुसरा खरा नाही. ते Sentiments ना केवळ भावात्म (affective) मानतात ही गोष्ट शास्त्रविरुद्ध आहे. मॅगडुगल Sentiments ना Affective-conative attitudes or conative trends मानतो (Outline पृ. ३३६, ४१८ व ४१९ पाहा). ४ ते म्हणतात की Sentiments हे निर्विषय नसून सविषय आहेत" (पृ. १६०) कारण त्यांच्या मतें स्थायी भावांचे (म्हणजे Instincts) विषय निसर्गदत्त असतात. कारण ते सहजवासनासंस्कार आहेत. पण Sentiments हे स्वार्जित भावनासंस्कार असल्याने त्यांचे विषय अनुभवदत्त असतात (पान २६१). प्रो. वाडेकर म्हणतात तसा विषयभेद मॅगडुगलने ('Energies of men' पृ. २०६) दिला आहे. पण Instincts किंवा Sentiments या दोहोंपैकी कोणीहि निर्विषय आहे असें त्याने बिलकूल सांगितलेलें नाही. फार झालें तर या दोहोंच्या विषयांत तो वरीलप्रमाणे भेद कल्पितो.

वरील सूक्ष्मभेदाबद्दल कांहीहि असलें तरी संस्कृत स्थायी भावांचे विषय Instincts च्या विषयांप्रमाणे निसर्गदत्त वस्तुवर्गरूपच असतात असें मुळीच दिसत नाही. अुलट रसिकांच्या स्थायी भावांना अुद्दीपित करणारे काव्यगत आलंबनविभाव बहुधा राम-सीता, दुर्योधन-भीम, दुष्यन्त-शकुन्तला अित्यादि अनुभवदत्त विशिष्ट व्यक्ति किंवा व्यक्तिसमूहच असतात. अुद्दीपनविभाव तर बोलूनचालून प्रवुद्ध झालेल्या भावनेला वरचेवर अुद्दीपित करून तिला तिच्या विषयाभोवतीं पक्की करण्यासाठीच प्रवृत्त झालेले असल्याने ते Sentiment प्रक्रियेचेच स्पष्ट द्योतक आहेत. त्यामुळे विषयभेदाचा हा मुद्दा कोणत्या पक्षास अधिक अनुकूल होत असेल तर तो Sentiment पक्षासच होतो ! कारण सर्व काव्यव्यवहारच मुळी अनुभवसंपादित मनोघटनांच्या आधारें व अनुभवदत्त अुद्दीपनांच्या द्वारेच चालला असल्याने तेथे अनुभवदत्त विषयाचेंच प्राचुर्य असणार हें सांगावयास नकोच. ५ संस्कृत स्थायी भावांना अुद्देशूनच सांगितलेलें प्रमुखत्व, प्रभावित्व, अतिरोहितत्व, चर्वणापात्रत्व, चिरस्थायित्व, आनंदांकुरत्व अित्यादि धर्म प्रो. वाडेकर Instincts कडे वळवितात; पण वर सांगितल्याप्रमाणे अेकूणपन्नास भावांतील स्थायी भावांचें म्हणजेच भावरूपप्रकट वासनेचें श्रेष्ठत्व व आस्वाद्यत्व अशा ठिकाणीं साक्षात् अुद्दिष्ट आहे. निगूढ वासनेचा येथे साक्षात् संबंध नाही. Instincts सर्व मानसव्यापारांना परंपरया प्रेरक असतील पण तेवढ्याने त्यांच्या भावस्वरूपांतील अुत्तरकालीन घटनांचें साक्षात्जनकत्व व आस्वाद्यत्व त्यांचेकडे देणें अयोग्य होय. फुलाला फळाचें साक्षात् अुत्पत्तिकारण मानणें रास्त आहे, मूळाला नव्हे. मूळ हें परंपरेने सर्वच वृक्षाचें आदिकारण असतें ही गोष्ट तत्त्वतः कोणीच अमान्य करीत नाही. म्हणून प्रो. वाडेकरांनी Instincts ना दिलेलें प्राधान्य व जनकत्व (पृ. २६२-२६३) केवळ दूरतः असून शिवाय अनभिप्रेत आहे.

याप्रमाणे प्रो. वाडेकरांच्या आक्षेपांना अुत्तरें दिलीं. ते आपल्या लेखाच्या शेवटीं म्हणतात कीं, "स्थायी भाव व Sentiments या दोहोंत वाटणारें साम्य केवळ आकारिक (Formal) आहे, वास्तव (Material) नाही." माझा वरील खुलासा पाहून प्रो. वाडेकर म्हणतात तसें साम्य स्थायीभाव व Instincts यांच्यामध्ये आहे का स्थायी भाव व Sentiments मध्ये आहे हें तज्ज्ञ वाचकांनीच ठरवावें.

५

वर विवेचिल्याप्रमाणे स्थायी भावांचें साम्य Sentiments शीं कल्पिणें कसें युक्त आहे हें ध्यानीं आलें असेल. आता Instincts शीं त्यांचें साम्य मानणें कसें अयुक्त आहे तें दाखवितों. ज्या काव्यांतील रसांच्या आस्वादाला आवश्यक म्हणून स्थायी भावांची चर्चा मुख्यतः करण्यांत येते त्या काव्याची कविकृत निर्मिति किंवा रसिकाकडून घेतला जाणारा त्याचा आस्वाद या दोन्हीहि गोष्टी निव्वळ सहजप्रवृत्तींच्या पातळीवर (mere instinctual plane) कधीच होत नाहीत. कवि काय किंवा रसिक काय सुसंस्कृत, अनुभवी, प्रगल्भ, कलासक्त व भोवतालच्या जगांतील सुसंस्कृत व्यवहाराबद्दल कांही भावना आपल्या चित्तांत स्थिर करून ठेवणारा प्रतिभानशाली सहृदय असावा लागतो. जगांतील अनुभवाने, संस्कृतिविकासाने व अुन्नयनाने (Sublimation) मानवांच्या Instincts ना नवें वळण लागल्यावर त्यांच्या व्यवहाराला जें अेक नवें व संपन्न रूप येतें तेंच काव्यांत प्रतिपाद्य व आस्वाद्य आहे. कामवासनेचें रानटी व केवळ शारीरिक क्षुधाशमनात्मक रूप सत्काव्यांतील शृंगाररसाच्या पदवीला कधीच पोहोचत नाही. तीच गोष्ट भक्ति या अत्यंत संमिश्र व सुसंस्कृत भावनेची



समजावी. शान्त रस तर सुसंस्कृत जीवनाच्या दुधावरील साय आहे. कारण या शान्त रसांत अभिप्रेत असलेलें तृष्णाक्षयसुख सहजप्रवृत्तीच्या पातळीतलें नव्हे असें नुसतें म्हणणें पुरेसें होणार नाही तर तें त्या पातळीला पूर्णपणें विरोधी आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. या रसाची लज्जत केवळ सहज-प्रेरणायुक्त माणसाला कळणें दुरापास्त आहे. कवि व रसिक यांचा हृदय-संवाद व्हावयाचा हवा असला तर ते दोघेहि सारखेच अनुभवी असावे लागतात. कवि राष्ट्रा-बद्दलची आपली भक्ति आर्ततेनें आळवीत असला तर राष्ट्र नांवाच्या वस्तुबद्दल रसिकाची भावना आगाऊ तयार होऊन राहिलेली असली पाहिजे. तरच त्याला कवीच्या भावनात्मक अनुभवाशीं समरस होतां येईल. येथे रसिकाची नुसती Instinct किंवा नुसते चंचल Primary emotions काय कामाचे ? रसिकाला जें Emotion हवें असतें तें स्थिर किंवा संघटित रूपाचें हवें. म्हणजे त्या संस्काररूपाच्या तबकडीवर काव्यगत-विभावादींचें सूच्यग्र (Pin) ठेविलें की रसिक हृदयाच्या ध्वनियंत्रांत राष्ट्रप्रेमाचें सुरेल संगीत निनादूं लागतें. Instinct किंवा अस्थिर Primary emotions याच गोष्टी रसास्वादास पुरेशा असतील तर कोणीहि माणूस– तो माणूस आहे या कारणासाठी– कोणत्याहि काव्या-स्वादाला सारखाच पात्र ठरेल ! शेवटीं याबद्दल हेंहि सांगावयाचें कीं काव्यास्वाद घेणारी रसिकाची मनोघटना जर त्याच्या पूर्वअनुभवाशीं, अंदाजाशीं, अटकळीशीं, वस्तूंच्या व व्यक्तींच्या चांगलेवाईटपणाच्या कल्पनांशीं, थोडक्यांत बोलावयाचें तर सुसंस्कृत समाज-जीवनाच्या जाणिवेशीं, संबद्ध नसेल तर काव्यास्वादजन्य रसांचा प्राण व मुख्य निदान जो 'औचित्यबंध', तो विफल ठरेल. आस्वाद्य आणि अनास्वाद्य हा भेद राहणार नाही. कारण सहजप्रवृत्तिप्रेरित व्यवहाराला (Instinctive behaviour) धर्म्य, अधर्म्य, नीति, अनीति, उच्चनीच हा मानवनिर्मित निर्बंध माहीत नसतो. शिवाय हा सहजप्रेरणाकृत मनोव्यापार प्रायः एकरूप, ठराविक व कांहीसा यंत्रबद्ध होत असल्याने काव्यनिर्मितींत व तिच्या आस्वादांत जी वैयक्तिकता (Subjectivity) आवश्यक असते ती अजिबात राहणार नाही व काव्यें म्हणजे फळांफुलांप्रमाणे केवळ बाह्येंद्रियस्पर्शी व सर्वजनसाधारण जड वस्तु होऊन बसतील (रसविमर्श पृ. १६८ पाहा).

स्थायी भाव म्हणजे Instincts किंवा Prepensities या आपल्या मताला पुष्टि देण्यासाठी ज्या 'ख्यातनाम' मानसशास्त्रज्ञ प्राध्यापक पी. एस्. नायडूंचा उल्लेख प्रो.वाडेकरांनी केला आहे (पृ.२६३) त्या प्रो. नायडूंचीच माझ्या वरील मताला पूर्ण संमति आहे. ते रसिक व रसास्वाद याबद्दल त्याच लेखांत काय म्हणतात तें पाहा— Rasa is the peculiar experience which is generated in the mind of the *adult* whose mental structure *has evolved to a fairly high level through the formation of complex sentiments,* the excitant being an aesthetic object." तसेंच Sentiment हा शब्द घालून रसाची व्याख्या ते पुढीलप्रमाणे करितात– 'Rasa, then, may be defined as the mental counterpart of the totality of experience generated in a cultured person by the sympathetic induction of blended emotions *pertaining to sentiments* by excitants of a purely aesthetic origin' (पृ. १२ प्रो. वाडेकरांनी उल्लेखिलेला त्यांचा लेख). तसेंच, दुसऱ्या एका लेखांत प्रो.नायडू म्हणतात– 'It is the sympathetic induction of the *sentiments* that is the basis of Rasa-' (The concept of suggestion P 297. Kane Vol.). तसेंच, प्रा. नायडू (त्यांच्या वरील प्रथमोक्त लेखांत) असेंहि स्वच्छपणें

कबूल करतात की, संस्कृत स्थायिभावांपैकी कांही मात्र तरी (म्हणजे हास्य, वीर, करुण व शृंगार) "higher sentimental levelचे आहेत (पृ. ७). प्रो. नायडूंना स्थायिभाव म्हणजे Instincts असें ठामपणें म्हणावयाचें असेल तर त्यांनी अेकाच लेखांत स्वमतविरोध केला आहे असें वाटतें. म्हणून प्रो. वाडेकरांना या आधाराचा विशेषसा अुपयोग होअील असें दिसत नाही. माझ्या मतें स्थायिभावांना अनुलक्षून योजलेल्या 'वासना' या संदिग्ध शब्दाने दोघांनाहि चकविलें असावें. खरें काय असेल तें असो.

प्रो. वाडेकरांनी आपल्या मताला दुसरी पुष्टि पंडित पी. पी. शास्त्री यांची दिली आहे. या पंडितांनी आपल्या ग्रंथांत स्थायिभावाला जो Instinct हा शब्द योजला आहे तो मानसशास्त्रीय अभिनिवेशाने योजिलेला दिसत नाही. कारण रसांचें मानसशास्त्रीय दृष्ट्या विवेचन करणें हा त्यांचा अुक्त व मुख्य हेतु त्यांच्या ग्रंथांत मुळीच नाही. त्यांनाहि सुप्त वासनेनेच Instinct कडे वळविलेलें दिसतें. स्थायिभावाला अिंग्रजी पर्याय देतांना अितर अनेकांनी दुसरेहि कांही शब्द वापरले आहेत. अुदाहरणार्थ डॉ० सुशीलकुमार दे व म. म. पां. वा. काणे यांनी स्थायिभावांना अुद्देशून 'Mood' हा शब्द अुपयोजिला आहे. पण हा वापरतांना या दोघांनाहि मानसशास्त्रीय चिकित्सा अभिप्रेत होती असें वाटत नाही. वास्तविक Mood हा प्रतिरुद्ध भावनेचा अंतर्मनांत दीर्घकाल घुमत राहणारा नुसता प्रतिध्वनि आहे. मूळ भावना प्रबुद्ध होण्याला विषयाचें दर्शन किंवा चिंतन जरूर असतें. पण तज्जन्य Mood ला तेवढेंहि लागत नाही. म्हणजे मूळ ध्वनि व त्याचा प्रतिध्वनि यांचेमधील जें अन्तर तेंच मूळ भावना व Mood यांमध्ये आहे. Mood हा क्रियाप्रेरणेचा (Conation) व भावनेचा अन्तर्मनांत घुमसणारा केवळ अवशेष आहे. तात्पर्य, Moods हे मनाचे स्थायी, प्रभावी, स्वतंत्र किंवा निर्णायक घटक नसल्यानें त्यांना स्थायिभावाशीं तुल्य कल्पिणें योग्य होणार नाही. प्रो. व्ही. राघवन् स्थायिभावाला परिपुष्ट प्राथमिक भाव (developed primary emotion) म्हणतात. त्यांचा विचार वर ओझरता येअून गेलाच आहे. तात्पर्य, असें मतवैचित्र्य या बाबतींत असल्यानें कोणी कोणाचा अधिकार ग्राह्य मानावयाचा ही वैयक्तिक बाब आहे.

शेवटीं अेवढेंच सांगावयाचें की जुनें रसशास्त्र आधुनिक मानसशास्त्रदृष्ट्या तपासून पाहणें हें काम सोपें नाही. या दोहोंतील कल्पनांची साम्यस्थापना जपून केली पाहिजे. स्थायिभाव म्हणजे (1) Primary emotions, (2) Instincts, व (3) Sentiments या तीन पक्षांपैकी पहिल्यापेक्षा दुसरा व दुसऱ्यापेक्षां तिसरा त्यांतल्या त्यांत अधिक सयुक्तिक दिसतो. तीनहि पक्षांत कमीअधिक प्रमाणांत अडचणी आहेत. पण 'Sentiment' पक्षांत त्या सर्वांत कमी आहेत. म्हणून 'स्थायिभाव म्हणजे Sentiment च' असें मी मानतों. याअुपर संस्कृत साहित्यशास्त्र व आधुनिक मानसशास्त्र हीं दोन्हीहि अुत्तम जाणणाऱ्या अेखाद्या पंडिताने याबद्दल निराळें कांही निर्णायक सांगितलें तर तें स्वीकारण्यास खुल्या दिलाने मी सज्जच आहें.

(ही चर्चा सध्या येथेच थांबविली आहे—सं.)

---

अनुक्रमणिका

# कै. दत्तात्रेय विष्णु आपटे

महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध अितिहाससंशोधक श्री. द. वि. आपटे हे ता. २७।१०।४३ रोजीं सकाळीं पुणें येथे आनंदाश्रमांत त्यांच्या निवासस्थानीं अेकाअेकीं मृत्यु पावले. त्यांच्या मृत्यूने मराठी अितिहासाची निःसंशय अपरिमित हानि झाली आहे. अि. स. १९१० सालीं पुण्यांत भारत-अितिहास-संशोधक-मंडळाची स्थापना झाल्यावर मराठ्यांच्या अितिहासाचीं साधनें गोळा करण्याचें व त्यांची पद्धतशीर चिकित्सा करण्याचें सामुदायिक कार्य सुरू झालें. मंडळाच्या पहिल्या दहाबारा वर्षांत त्याच्या कार्यावर अितिहासाचार्य कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांची छाप असे. कारण महत्त्वाचे व शोधपूर्ण असे कित्येक निबंध तेच लिहीत व वाचीत. पण पुढील काळांत अनेक कारणांनी मंडळ त्यांच्या संशोधनास अंतरलें व अि. स. १९२७ सालीं तर राजवाड्यांनी अिहलोकची यात्राच संपविली. राजवाडे गेले परंतु राजवाडयांनी घालून दिलेली चिकित्सक संशोधनाची परंपरा मंडळांत चालू राहिली. कै. पाण्डोबा पटवर्धन, प्रो. पोतदार, श्री. आबा चांदोरकर वगैरे मंडळी राजवाड्यांच्या तालमींत तयार झाली व त्यांनी दरसाल मंडळाच्या पाक्षिक सभा व वार्षिक संमेलनें यांच्या द्वारा संशोधनाचें कार्य तेवत ठेवलें. पैकी पाण्डोबा अि. स. १९२१ सालीं दिवंगत झाले, आबा अन्य व्यवसायांत गुंतले. प्रा. पोतदारांच्यावर संशोधनाबरोबरच चिटणीशी कामाचा बोजा अेवढा पडला कीं त्यांना संशोधनाच्या कार्यास केवळ फुरसतीचें लक्ष द्यावें लागलें. अशा वेळीं राजवाड्यांची संशोधनाची परंपरा त्यांच्यामागे मंडळांत प्रामुख्याने चालू ठेवणारा पुरुष कै. दत्तोपंत आपटे होय. आणि त्यांच्या मृत्यूनंतर श्री. शंकरराव जोशी, श्री. ग. ह. खरे यांच्यासारखे त्यांचे शिष्य जरी आपापल्या मगदुराप्रमाणे कार्य करीत असले व त्यांचा भविष्यकाळ जरी निःसंशय अुज्ज्वल दिसत असला तरी आज कै. आपटे यांच्या तोडीचा संशोधक मंडळांत व महाराष्ट्रांत दाखविणें दुरापास्त आहे.

त्यांचा जन्म १३ मार्च १८८१ रोजीं सांगली संस्थानांत हनगंडी येथे झाला. अि. स. १९०२ सालीं फर्ग्युसन कॉलेजांतून गणित विषय घेअून ते बी. अे. झाले. रँ. परांजपे यांच्या पहिल्या वर्षांच्या विद्यार्थ्यांपैकी ते अेक होते. वंगभंगाच्या चळवळींत यवतमाळ येथे निघालेल्या राष्ट्रीय शाळेचे ते तीन वर्षें मुख्याध्यापक होते. त्या कालांत त्यांनी हरिकिशोर हें वर्तमानपत्रहि चालविलें. पुढे अि. स. १९०८ चे सुमारास दोन्ही बंद पडल्यावर ते मुंबअीस 'राष्ट्रमता'चे संपादक झाले. तेथून अेक वर्षाने ते गोव्यास गेले व तेथे आल्मैद कॉलेज ही शाळा चार वर्षे चालविली. अि. स. १९०८ ते १४ हा काल अनेक देशभक्तांच्या अज्ञातवासाचा व हालअपेष्टेचा काल होय. अि. स. १९१५ त दत्तोपंत पुण्यास येअून चित्रमयजगत्चे संपादक झाले. तेथे सुमारें सात वर्षें त्यांनी काम केलें. अि. स. १९२४ सालीं त्यांना 'आनंदाश्रमा'च्या व्यवस्थापकाचें काम मिळून त्यांच्या भिरभिरत्या व खडतर जीवनास कांहींसें स्थैर्य लाभलें व तेथेच त्यांनी आपल्या आयुष्याचीं अुर्वरित वर्षें सतत अितिहासाच्या अध्ययन-अध्यापनांत घालविलीं. पुण्यास १९१५ सालीं आल्यापासून त्यांना प्रथम अितिहास व नंतर गणित या दोन विषयांचा छंद लागला व या विषयांच्या चिंतनांत ते अक्षरशः तन्मय

अनुक्रमणिका

होत. अंगीकृत विषयाच्या अभ्यासांत समाधि लागलेले ऋषितुल्य विद्याव्यासंगी पुरुष केव्हाहि दुर्मिळच. कै. दत्तोपंत हे त्यांपैकी होते. त्यांची राहणी साधी, करारी, राष्ट्रीय बाण्याची, स्वभाव निगर्वी, विनयोल्का, निर्वैर व साधुवृत्तीचा व त्यांचें सारें लक्ष स्वतः अितिहासाचा अभ्यास करून जवळ येणाऱ्या तरुणांना त्या अभ्यासांत गुंतवावें अिकडे असे. कै. दत्तोपंतांचें अंतर्मन गेलेलें स्वातंत्र्य भारतास पुनः कसें मिळेल याच्या चिंतनांत गुंतलेलें असे व या चिंतनशील वृत्तींतून मराठ्यांचें स्वातंत्र्य कां गेलें, मराठ्यांनी राज्य तरी कसें कमावलें व राखलें ? या अैतिहासिक विषयांकडे लागलें. त्या विषयाचा व्याप जसजसा त्यांना दिसूं लागला तसतसें अैतिहासिक तत्त्वज्ञानापेक्षा अितिहासाच्या शास्त्रीय रचनेकडे व त्यासाठीं आवश्यक असलेल्या संशोधनाकडे त्यांचें चित्त गुंतलें. सारांश, त्यांच्या शास्त्रीय संशोधनवृत्तीचा अुगम राष्ट्रीय व तात्त्विक विचारसरणींतून झाला होता, व जरी ते मुख्यतः आपला वेळ संशोधनांत व साधनचिकित्सेंत घालवीत तरी अितिहासाची तात्त्विक चर्चा त्यांना फार आवडे. आधुनिक पाश्चिमात्य अितिहासतत्त्वज्ञांनी टॉयनबी स्पेंग्लर यांचे ग्रंथ ते लक्षपूर्वक वाचीत व 'सह्याद्रि'सारख्या मासिकांतून मराठी वाचकांस त्यांचा परिचय करून देत.

तरुण अभ्यासकास अुत्तेजन देण्यांत त्यांना आपल्या श्रमांचें कांहीं वाटत नसे. त्यांच्याहून किती तरी कमी योग्यतेच्या विद्यार्थ्यांशींहि ते अितक्या सौजन्यानें वागत की जणू काय तें आपलेंच काम करीत आहों असें दत्तोपंतांस वाटे. अि. स. १९३० सालीं त्यांनी 'शिवचरित्रकार्यालय' ही संस्था काढून तीमार्फत शिवचरित्रनिबंधावरील ग्रंथ संपादण्यास घेतला व अनेक लहानथोर अितिहासभक्तांस हाताशीं धरलें. प्रस्तुत लेखकास त्यांतील अेक भाग लिहिण्यास दिला. त्याचें कच्चें काम पुरें करून कसें काय झालें हें दाखविण्यास श्री. आपटे यांच्याकडे कांहींसा संकोचानेच मी गेलों असतां श्री. आपटे म्हणाले, 'अहो, त्यांत काय पाहावयाचें ? तुम्हीं परिश्रम केलेत तर काम चांगलें होणारच. तें मीं वाचून पाहण्याची जरूर नाहीं' असें म्हणून मीं हातीं घेतलेल्या विषयावर त्यांनी आणखी अितके नवीन मुद्दे सुचविले की मला माझा निबंध पुनः लिहावा असें वाटूं लागलें ! व त्यांनी सुचविलेल्या मुद्यांची त्यांत भर घालून तो 'माझा' म्हणून त्यांत छापला गेला. खरें म्हटलें तर दत्तोपंतांनी त्यांतले किती तरी मुद्दे सुचविले आहेत. तरुणांशीं त्यांची वागण्याची पद्धत ही अशा तऱ्हेची होती.

कै. दत्तोपंतांनी आपल्या हयातींत राजवाड्यांची परंपरा पुढे चालविली असें वर म्हटलें आहे तें विशिष्ट अर्थानें खरें आहे. परंपरा राजवाड्यांची खरी पण कार्यपद्धति अेक होती असें म्हणतां येणार नाही. कै. राजवाड्यांची प्रतिभा विशाल व बुद्धि सूक्ष्मगामी असली तरी कै. दत्तोपंत आपटे यांचा लोकसंग्रह कै. राजवाडे यांना साधला नाही. खेरीज कै. राजवाडे केव्हा केव्हा आपल्या प्रतिभेनें स्फुरित झालेलीं अनुमानें सिद्ध करण्यासाठीं पुराव्याची परंपरा रचीत. अशा वेळीं त्यांच्या प्रतिभेचा विस्मय वाटला, तरी पुराव्याबद्दल वाचकाची खात्री पटत असे असें नाही. (अुदाहरणार्थ राधामाधवविलासचंपूची प्रस्तावना पाहा.) कै. दत्तोपंत अशा रीतीनें कल्पनेच्या आहारीं जावयाचे नाहीत. कै. राजवाड्यांची विशाल प्रतिमा त्यांच्याजवळ नव्हती, पण आपल्या आवडत्या स्फुरित सिद्धान्ता(Theory)च्या आहारीं गेल्याचेंहि त्यांच्या लिखाणांत दिसून येत नाही. पुराव्यांत दिसलें तेवढेंच त्यांनी आपल्या लेखांतून मांडलें.

कै. दत्तोपंतांनी फुटकळ लेख निबंध पुष्कळ लिहिले तरी त्यांची ग्रंथसंपत्ति मर्यादितच आहे. (१) श्रीरंगपट्टणची मोहीम पृष्ठ संख्या २४८, (२) शिवभारताची प्रस्तावना पृ. सं.

२००, (३) मुधोळ संस्थानच्या घोरपडे घराण्याचा अितिहास प्रस्तावना, पृ. सं. १८७, (४) शिवचरित्रप्रदीप व निबंधावली या ग्रंथांतील अनेक शिवचरित्रसंशोधनविषयक निबंध हेंच त्यांचें प्रदीर्घ स्वरूपाचें वाङ्मय. या चार ग्रंथांतून कै. दत्तोपंताचे विशिष्ट गुण नजरेस पडतात. 'श्रीरंगपट्टणची मोहीम' या ग्रंथांत भरपूर पुराव्याच्या तपशीलांतून विषयाची सुसंगत मांडणी व त्यांत मराठ्यांचें 'मराठपणचें तेज' खुलवून दाखविणें हें कार्य त्यांनी साधलें आहे. तपशीलाच्या गोंधळांत स्वतःच गडबडून ते गेले नाहींत. शिवचरित्रप्रदीपांतील शिवजन्मतिथीच्या निर्णयावरील त्यांचा निबंध पुढे आलेल्या पुराव्याची शहानिशा कशी करावी, ग्राह्याग्राह्यता कशी ठरवावी, हें दाखविणारा आदर्श निबंध होय. यांतच त्यांच्या ज्योतिर्गणितविषयक ज्ञानाची भर पडल्याने अनेक सन-शक-मितींच्या गुंतागुंतींतून अचूक कालनिर्णयाची पद्धतहि त्यांनी दाखवून दिली. शिवभारताच्या प्रस्तावनेंत त्यांनीं लिहिलेलीं पहिलीं १ ते १३ व ३४ ते ५९ पृष्ठें नवशिक्यास संशोधनशास्त्रांत प्रवेश करून देण्यास अुपयोगी पडतील. शिवभारताची अवशिष्ट प्रस्तावना व मुधोळकर घोरपडे संस्थान अितिहास प्रस्तावना या लेखांतून अुपलब्ध पुराव्यांवरून सुचणाऱ्या सिद्धान्तांचें त्यांनी पूर्वग्रहापासून अलिप्त, अनाग्रही पण मुद्देसूद असें तात्त्विक विवेचन केलें आहे. सारांश तपशीलाची मांडणी, कालनिर्णयाची हातोटी, संशोधनास पद्धतशीरपणा लावून देण्याचें कौशल्य व तात्त्विक विवेचनाचा मगदूर या चतुर्विध कार्यांत दत्तोपंत चतुरस्र होते. विद्यापीठाचा पाठिंबा नसल्याने मराठी अितिहाससंशोधन अेक प्रकारें पोरकें असतांहि मराठी अितिहाससंशोधनास प्रारंभापासून अितर प्रांतांत दिसून न येणारें शास्त्रीय वळण लागलें ही अभिमानाची गोष्ट आहे व हा अभिमान राजवाड्यांनंतर सकारण कायम राहण्यास कै. दत्तोपंत आपटे हे कारणीभूत झाले. ही दत्तोपंतांची अितिहासविषयक कामगिरी होय.

त्यांच्या सांनिध्याचा लाभ ज्यांना झाला त्यांना आपण अेका अंतर्मुख, विद्वान्, सच्छील, साधु पुरुषाच्या संगतीस अंतरलों असें वाटल्याशिवाय राहत नाही.

रा. वि. ओतुरकर

# मार्तंड नव्हे, खंडेराव

(प्रा. दत्तो वामन पोतदार)

विद्वद्वर्य माधवशास्त्री वझे यांनी आपल्या 'माझा चित्रपट व काशीचा संपूर्ण अितिहास' या ग्रंथांत श्रीविश्वेश्वरमंदिराचा जीर्णोद्धार मातोश्री अहिल्याबाअी होळकर यांनी केल्याचा शिलालेख प्रसिद्ध केला आहे. हा शिलालेख महत्त्वाचा आहे आणि तो शास्त्रशुद्ध रीत्या पुनः छापला गेला पाहिजे. हा शिलालेख शोधून प्रसिद्ध केल्याबद्दल शास्त्री पितापुत्रांचें अवश्य अभिनंदन केलें पाहिजे.

मूळ शिलालेख संस्कृतांत आहे तो देअून त्याचा मराठी सारांश देतांना अेक चूक झाली आहे ती तशीच राहूं देणें योग्य नाही असें वाटल्यावरून हें टिपण प्रसिद्ध करीत आहें.

शिलालेख श्लोक तिसरा:— यांत अहल्याबाअींचें वर्णन आहे. ती मल्हाररावांची सून आणि 'मार्तंडाख्य नामकस्य...पत्नी' असा अुल्लेख या पद्यांत आहे.

आता मराठी सारांशांत पुढील वाक्य आहे:— 'त्याला (म्ह. मल्हारराव होळकराला) त्याच्याचप्रमाणे गुणशीलवान् **मार्तंड** या नांवाचा मुलगा होता.

थोरले मल्हारराव होळकर यांच्या अेकुलत्या अेक पुत्राचें नांव मार्तंड नसून खंडेराव होतें हें सर्वश्रुतच आहे. आणि शिलालेखांतील पद्यहि 'मार्तंड' नांव देत नाही. पद्यांत '**मार्तंडापर**-नामकस्य' अशीं अक्षरें आहेत. त्यांचा अर्थ मार्तंड (अर्थात् या प्रकरणीं देव मल्लारिमार्तंड) यांचें अपर म्हणजे दुसरें नांव हें ज्याचें नांव आहे असा जो त्याचा, असा आहे. मल्लारीचें अथवा मार्तंडाचें दुसरें देवनांव खंडेराय आणि तेंच येथे पद्यकर्त्यास अभिप्रेत आहे. मल्हार-राव होळकर यांचा पुत्र जो खंडेराव त्याची पत्नी जी अहिल्या तिचें स्तवन श्लोकांत आहे.

[मार्तंडापरनामकस्य या समस्त पदाची फोड अशी:— अपरं च तन्नाम अपरनाम। मार्तंडस्य अपरनाम यस्य सः ॥]

---

## मराठी नाटकाचा जन्मकाल
### (निदानपक्षीं ११५ वर्षांपूर्वी)

मराठी नाट्याचा अखिल महाराष्ट्रीय शतसांवत्सरिक समारंभ मोठ्या थाटाने नुकताच पार पडला आणि स्थानिक स्वरूपाचे समारंभ अजूनहि होत आहेत. तथापि मराठी पहिलें नाटक रंगभूमीवर आल्यास निदान ११५ वर्षे झालीं असें सिद्ध करणारा संशयातीत पुरावा आता अुपलब्ध झाला आहे. गोमंतकांतील 'मठग्राम नगरींत' म्हणजे मडगांवांत 'श्रीराम-जन्मोत्सव महाजनीय संस्था' या नांवाची ब्राह्मणाची अेक संस्था आहे. या संस्थेची स्थापना केव्हा झाली तें नक्की समजलेलें नाही. पण शालिवाहन शकाच्या १७५३ (प्रजापति संवत्सर) च्या चैत्र वद्य १३ सोमवार रोजीं भरलेल्या सदर संस्थेच्या अेका बैठकीचा तहनामा, तिच्या दप्तरांतील जुन्या वहींत सांपडला आहे. या तहनाम्यांत "रंगभूमीवर 'खेळ' म्हणजे नाटकें करून आज तीन वर्षे झालीं व तीं व्यवस्थित अुतरलीं; तेव्हा यापुढे तीं **सारोद्धार** म्हणजे सतत चालावीं याबद्दलची व्यवस्था करणें योग्य होअील" अशी प्रस्तावना करून, वर्गणी कशी मिळवावी, ती कशी सांभाळावी, हरिदासास किती बिदागी द्यावी, मंडपअुभारणीस किती खर्च करावा, सोंगें रेखाटण्यास किती देणगी द्यावी, 'नेसण-शृंगार' करण्यास किती वेतन असावें अित्यादींचा तपशील थोडक्यांत दिला आहे. अर्थात् शके १७५३ पूर्वी तीन वर्षे म्हणजे १७५० शकेंत मडगांवांत पहिलें नाटक रंगभूमीवर आलें असलें पाहिजे असें धरावें लागतें. अर्थात् आज या गोष्टीला आज ११५ वर्षे होतात. तथापि अितर ठिकाणीं आणखी आठ दहा वर्षे तरी अगोदर नाटकें होत असावीं असें म्हणतां येअील. आणि तसें म्हटलें तर मराठी रंगभूमि निदान सवाशें वर्षांपूर्वी जन्मली असें मानतां येअील. तरी या दृष्टीने विशेष संशोधन होणें जरूर आहे हें रंगभूमीच्या चहात्यांच्या व अितिहाससंशोध-कांच्या लक्षांत यावें अेवढ्याच हेतूने हे धावते चार शब्द येथे लिहीत आहें. वर अुल्लेखि-लेल्या तहनाम्याचा फोटो घेअून त्याचा ठसा करावा व तो प्रसिद्धीस आणावा असे प्रयत्न चालू आहेत. ही माहिती नाट्यस्मारकग्रंथाचे मुख्य संपादक प्रा. बनहट्टी यांच्याकडे पाठव-ण्यांत आली आहे.

मडगांव, २५।१।४४ — दत्तात्रेय व्यं. पै

## परीक्षणें.

### धर्म-तत्त्वज्ञान

**योगीश्वर-याज्ञवल्क्य-दर्शन** (पूर्वार्ध)— ले० रामचंद्र गोविंद कोलंगडे; प्रका० कोलंगडे आणि बंधु, हुबळी; मू. रु. ५

वैदिक वाङ्मयासंबंधीं विचार करूं लागल्यास साधारणपणें असें दिसून येतें कीं अनेक अेतद्देशीय व पाश्चात्य अभ्यासकांच्या हातून त्या वाङ्मयसंभारांतील ब्राह्मणग्रंथांच्या बाबतींत अेक प्रकारचा अन्याय घडत आलेला आहे. ब्राह्मणांच्या यथार्थ महत्त्वाचें आकलन न झाल्यामुळे त्या ग्रंथांतून 'निरर्थक बडबडी'शिवाय— त्यांतूनहि 'याज्ञिकांच्या निरर्थक बडबडी' शिवाय— दुसरें कांहीं नाहीं असाहि कांहीं विद्वानांनीं आपला अभिप्राय व्यक्त केलेला आहे. अर्थात् हें मत अगदीच अेकांगी आहे हें सांगावयास नकोच. ब्राह्मणांचे मुख्यतः 'विधि' व 'अर्थवाद' असे दोन विभाग पडतात. त्यांपैकीं विधिविभागांत वेदकालीन यागादिकांचा मंत्र व तंत्र या दोन्ही दृष्टींनीं विचार केलेला आढळतो. यज्ञसंस्थेची परंपरा आज फारशी जिवंत राहिली नसल्यामुळे या विधिविभागाचें महत्त्वहि पूर्वीप्रमाणे राहिलें नाहीं; तरीहि प्राचीन भारतीय संस्कृतीच्या अितिहासांतील अेका मोठ्या कालखंडांत यज्ञसंस्थेचा अबाधित प्रभाव होता ही गोष्ट ब्राह्मण ग्रंथांच्या आधुनिक अभ्यासकांनीं दृष्टीआड करून चालणार नाहीं. ब्राह्मणग्रंथांतील अर्थवादविभाग तर अनेक दृष्टींनीं अभ्यसनीय आहे. वेदाभ्यासाच्या अनुषंगाने जीं अनेक शास्त्रें पुढे शिक्षाकल्पव्याकरणादि वेदांगें व पुराण-न्यायमीमांसादि वेदोपांगें म्हणून ग्रथित झालीं त्या सर्व शास्त्रांचीं व दर्शनादि तदितर शास्त्रांचींहि बीजें ब्राह्मणग्रंथांच्या या विभागांत आढळून येतात. अेवंच वैदिक संस्कृतीच्या आधुनिक अभ्यासकांनीहि ब्राह्मणग्रंथांचें अैतिहासिक दृष्ट्या परिशीलन केल्याविना त्यांच्या अभ्यासास पूर्णता येणार नाहीं. शिवाय, वेदसंहितांवरील 'पहिलीं भाष्यें', तसेंच, संस्कृत गद्याचे अति प्राचीन अवतार या दृष्टीनेहि ब्राह्मणग्रंथांचें माहात्म्य लक्षांत घेण्यासारखें आहे.

अशा ब्राह्मणग्रंथांत शतपथब्राह्मण हें प्रधान समजलें जातें. आधुनिक संशोधकांच्या दृष्टीने तर अखिल वैदिक वाङ्मयांत ऋक्संहिता व अथर्वसंहिता यांच्या खालोखाल श. प. ब्रा.-सच स्थान द्यावें लागेल. श. प. ब्रा. हें शुक्लयजुर्वेदाचें ब्राह्मण असून माध्यंदिन व काण्व या दोन शाखांतून अुपलब्ध आहे. या ब्राह्मणाच्या नांवावरूनच त्याचा विस्तार केवढा असावा याची कल्पना करतां येते. वैदिक कालांतील अेक अतिश्रेष्ठ विचारवान् द्रष्टा याज्ञवल्क्य याच्या असामान्य व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव या ब्राह्मणावर व तत्संबद्ध अितर वाङ्मयावर पडलेला स्पष्टपणें प्रतीत होतो. त्या योगीश्वर याज्ञवल्क्याच्या विचारसंपदेची व तत्कालीन भारतीय संस्कृतीची यथार्थ ओळख मराठी वाचकांस करून देण्यासाठी श्री. कोलंगडे यांनी 'याज्ञवल्क्य-दर्शन' या नांवाचा अेक मोठा ग्रंथ संकल्पिलेला आहे. त्या ग्रंथाचा शतपथब्राह्मणपरिचयात्मक पूर्वार्ध आज आपल्यापुढे असून मानवी जीवनोत्कर्षाचें रहस्य अुलगडून दाखविणारा अुत्तरार्धहि लवकरच वाचकांस सादर

करण्याचें लेखकानें अभिवचन दिलें आहे. श्री. कोलंगडे यांनी योगीश्वरग्रंथमालेंतील पहिलें चरित्रात्मक पुष्प 'योगीश्वर-याज्ञवल्क्य' हें प्रसिद्ध करून या महत्त्वाच्या विषयाची भूमिका अगोदरच तयार करून ठेविली आहे.

प्रस्तुत पुस्तकाचे मुख्यतः पांच विभाग केलेले आहेत. त्यांपैकी पहिल्या विभागांत प्रथमतः 'विषयप्रवेश' म्हणून सामान्यतः वेदवाङ्मयाचें व ब्राह्मणग्रंथांचें आणि विशेषतः श. प. ब्रा. चें माहात्म्य वर्णून नंतर शतपथाच्या बहिरंगाची ओळख करून दिलेली आहे. त्यापुढे शतपथब्राह्मणांतर्गत अग्न्याधानादि पुरुषमेधान्त यज्ञसंस्थांचें त्या ब्राह्मणानुसारच सरळ वर्णन केलेलें आहे. हाच या विभागांतील प्रमुख विषय होय. दुसऱ्या विभागांत श. प. ब्रा.-अर्थवादांत आलेल्या कांही कथा ग्रथित केलेल्या आहेत. तिसऱ्या विभागांत 'शतपथपुष्पांजलि' या नांवाखाली त्या ब्राह्मणांतील कांही निवडक वेंचे सस्वर देऊन त्यापुढे त्यांचें मराठी भाषान्तरहि दिलेलें आहे. चवथ्या विभागांत यज्ञसंस्थेविषयी तात्त्विक चर्चा केली आहे व परिशिष्टात्मक पांचव्या विभागांत 'योगीश्वर याज्ञवल्क्य-ब्रह्मर्षि यांचें ऐतिहासिक समालोचन' करतांना लेखकानें आपल्या पहिल्या चरित्रग्रंथावर आलेल्या आक्षेपांचें खंडन करण्याचा प्रयत्न केला आहे.

या ग्रंथांतील पहिल्या तीन विभागांचें स्वरूपच असें आहे की त्यांत विवाद्य विषय मुळीच येऊं नयेत. 'विषयप्रवेश' करतांना श. प. ब्रा. चें माहात्म्य सिद्ध करण्यासाठी जीं अनेक पाश्चात्य प्राच्यविद्याविशारदांचीं मतें लेखकानें स्थानीं-अस्थानीं उद्धृत केलेलीं आहेत त्यांची आवश्यकता होतीच असें वाटत नाही. शिवाय पदोपदीं वाचकांच्या तर्कबुद्धीऐवजी त्यांच्या श्रद्धेसच आवाहन अधिक प्रमाणांत केलें असल्यामुळे या विभागाच्या शास्त्रीयतेस बराचसा बाध आलेला आहे; किंबहुना हें विधान संपूर्ण ग्रंथाविषयीहि करतां येईल. तसेंच, यज्ञसंस्थेची परंपरा आज जिवंत नसल्यामुळे या विभागांतील विविध यागांचें सविस्तर वर्णन सामान्य वाचकांस कितपत उद्बोधक वाटेल याविषयीं शंका वाटते. दुसऱ्या विभागांत श. प. ब्रा. तील ज्या कथा दिलेल्या आहेत त्या मात्र निःसंशय बोधप्रद आहेत. त्यांची निवड लेखकाच्या मार्मिकतेची द्योतक आहे. तरीहि या कथांचें ऐतिहासिक, समाजशास्त्रीय, नीतिशास्त्रीय व दर्शनेतिहासात्मक दृष्टींनी काय महत्त्व आहे याचें लेखकानें थोडक्यांत का होईना पण दिग्दर्शन केलें असतें तर सांस्कृतिक साधनग्रंथ म्हणून या ग्रंथाची उपयुक्तता अधिक वाढली असती. मनु व जलप्रलय, च्यवन व सुकन्या, पुरूरवस् आणि उर्वशी इत्यादि कथांचें वर उल्लेखिलेल्या दृष्टींनी विवेचन करणें अवश्य होतें. पुढील विभागांत दिलेल्या शतपथब्राह्मणांतील वेंच्यांवरून ब्राह्मणग्रंथांचे, विशेषतः श. प. ब्रा. चे, भाषिक व वाङ्मयीन विशेष काय आहेत याची कल्पना करतां येते. चवथ्या विभागांतील यज्ञमीमांसेचा विषयप्रवेश करतांना व पुढेहि विषयप्रतिपादनाच्या अनुषंगानें लेखकानें बरेंचसें अप्रस्तुत– व कांही ठिकाणीं तर हास्यास्पद– लिखाण केलेलें आहे. सर्वसामान्य लोकांसाठी ग्रंथ लिहावयाचा– म्हणजेच तो popular करावयाचा– या हेतूनें श्री. कोलंगडे यांनी जी विशिष्ट भाषापद्धति व विचारसरणी– बहुंशीं पीतवृत्तपत्रीय स्वरूपाची– मुद्दाम स्वीकारली आहे ती या प्रकारच्या शास्त्रीय समजल्या जाणाऱ्या नित्य महत्त्वाच्या ग्रंथास मुळीच अनुरूप नाही असें म्हणावें लागतें. यज्ञमीमांसेंत प्रथमतः यज्ञसंस्थेचें ऐतिहासिक समालोचन करून नंतर तिच्यांतील गुण-दोषांचें ऐतिहासिक दृष्टीनेच विवेचन करावयास हवें होतें. परंतु असें कांही न करतां लेखकानें या विभागांत कांही उपयुक्त व उद्बोधक तर कांही अप्रस्तुत व हास्यास्पद अशा विषयाचा

समावेश केलेला आहे. त्या विषयांची मांडणी व्यवस्थित व सुसंगत झाली आहे किंवा तदनुषंगाने केलेलें निरनिराळ्या वादांचें विवेचन तर्कशुद्ध आहे असें मुळीच म्हणतां येणार नाही. या ग्रंथांतील स्वतंत्र स्वरूपाचा भाग तो अेवढाच; पण तो मुळीच समाधानकारक नाही असेंच म्हणावें लागतें. परिशिष्टांतील याज्ञवल्क्यविषयक अैतिहासिक समालोचन फारच विवाद्य स्वरूपाचें आहे. या लहानशा समीक्षणांत त्यांतील तपशीलाचा विचार करतां येणार नाही. परंतु येवढें मात्र या ठिकाणीं नमूद करावेंसें वाटतें की लेखकाने जे प्राचीन ग्रंथ अैतिहासिक साधनें म्हणून वापरले आहेत व ज्या रीतीने वापरले आहेत ते तसे व त्या रीतीने कितपत वापरतां येतील याविषयी सकारण जबरदस्त शंका वाटते.

वैदिक वाङ्मयाचा व संस्कृतीचा परिचय मराठी वाचकांस जसा व्हावयास पाहिजे तसा होत नाही व त्यामुळे त्यांविषयी लोकांत अनेक प्रकारचे लहानमोठे गैरसमज पसरलेले दिसून येतात. ते दूर व्हावे यासाठी केलेले वाङ्मयात्मक सर्वच प्रयत्न अभिनंदनार्ह आहेत. श्री. कोलंगडे यांच्या ग्रंथाचा अुद्दिष्ट हेतु निःसंशय प्रशंसनीय आहे. त्या हेतूच्या सिद्धयर्थ त्यांनी केलेले परिश्रमहि कौतुकास्पद आहेत. पण विषयप्रतिपादनांत दिसून येणारे अुपर्युक्त दोष लक्षांत घेतले असतां ग्रंथकाराचा हेतु सफल होईल किंवा नाही याविषयी मात्र संशय वाटतो.

रा. ना. दांडेकर

## अितिहास-राज्यशास्त्र

१ काँग्रेस आणि महायुद्ध— ले० श्री. पां. वा. गाडगीळ; प्रका० अधिकार प्रकाशन संस्था, ७९ हिंदु कालनी, दादर; पृ. सं. ११४+१२; किं. २ रु.

२ श्रीरामदासींची अैतिहासिक कागदपत्रें-- प्रका० शं. श्री. देव, सत्कार्योत्तेजक संस्था, धुळें; मूल्य रु. १।.

३ श्री सांप्रदायिक वृत्त, चर्चा, जीर्णोद्धार वगैरे--प्रका० शं. श्री. देव, धुळें; मूल्य आणे १०.

प्रस्तुतचें पुस्तक १९४३ च्या अेप्रिल-मे महिन्यांत लिहिलें व जुलैअखेर प्रसिद्ध झालें. अि. स. १९४२ च्या मार्च-अेप्रिलमध्ये क्रिप्स हिंदुस्थानांत आले व गेले. क्रिप्सयोजनेचे पाय परत फिरल्याने सनदशीर चळवळ करणारांची पूर्ण निराशा झाली व देशांत बेफिकीर अुतावीळ वैतागाचें वारें वाहूं लागलें. त्याचें प्रत्यंतर 'चले जाव' (Quit India) चळवळींत दिसून आलें. १९४२ च्या ऑगस्ट महिन्यापासून देशांत हलकल्लोळ अुत्पन्न झाला व त्याच्याच पाठोपाठ दडपशाही आली. अशा रीतीने सनदशीर चळवळ, निराशा, वैताग व दडपशाही येथपर्यंत राजकीय चळवळीचें आंदोलन येअून ठेपल्यावर 'पुढलें पाअूल' कोणत्या दृष्टीने टाकलें पाहिजे याचा विचार करण्यासाठी गतगोष्टींचें निर्विकार चिकित्सक व अैतिहासिक समालोचन केलें पाहिजे. तें करून आपल्या चुका कोणत्या झाल्या व त्या कशा सुधाराव्या हें दिग्दर्शित करण्याचा या पुस्तकाचा हेतु आहे. श्री. पां. वा. गाडगीळ हे महाराष्ट्रांतील अभ्यासी राजकारणी आहेत. त्यांच्याशीं कोणाचा मतभेद झाला तरी त्यांची कळकळ व अभ्यास त्यांच्याबद्दल आदरभाव अुत्पन्न करणारीं आहेत. संकटकाळीं सामान्य लोक कातावीत व कावरेबावरे होतात, थिल्लर आपापसांत भांडूं लागतात व अभ्यासक विचारप्रवण बनून परिस्थितीची छाननी करतात. श्री. गाडगीळ यांचें हें पुस्तक तिसऱ्या वर्गातील आहे हें सांगणें नकोच.

या पुस्तकांत श्री. गाडगीळ यांनी काँग्रेस व कम्यूनिस्ट यांच्या युद्धविषयक धोरणांतील चुका मोठ्या निर्भीडपणें दाखविल्या आहेत, व असें करीत असतां 'माझी ही टीका म्हणजे गांधींच्या नेतृत्वाला त्यांच्या गैरहजेरीचा व काँग्रेसच्या पराभवाचा फायदा घेऊन टोला देण्याचा प्रयत्न आहे असें कृपा करून वाचकांनी समजूं नये' (पृ. १०३) अशी त्यांची विनंती आहे. प्रस्तुत पुस्तकांत प्रस्तावनेंत पृ. ६-७ वर 'बंड' व 'फितुर' यांत दर्शविलेला सूक्ष्म भेद मार्मिकपणाचा आहे. १८ हिंदुस्थानांत तत्त्वनिष्ठ असें बंड झालें व ब्रह्मदेशांत मात्र फितुरी झाली हें श्री. गाडगीळांचें विधान अधिक पुराव्यावरूनच पारखून घेतलें पाहिजे. या पुस्तकाच्या अखेरीस लेखकाने मांडलेले दोन सिद्धान्त (१) हिंदुस्थानावरील परचक्रनिवारणांची जाबाबदारी कसल्याहि परिस्थितींत हिंदी लोकांना दुसऱ्यावर डावलतां येत नाही, व (२) हिंदी स्वातंत्र्याचा लढा यापुढे जागतिक अशान्ततेच्या दंगलींतच खेळावा लागेल, शान्ततेचा काळ येईल तेव्हा तो लढूं अशी स्वस्थपणाची अपेक्षा व्यर्थ होय. हे मान्य करण्यासारखे आहेत. त्याने नुकसान तर नाहीच पण झाला तर फायदाच आहे असें प्रस्तुत लेखकाचें मत आहे.

अेका गोष्टीबद्दल मात्र आग्रहपूर्वक मतभेद नमूद करवासा वाटतो. श्री. गाडगीळ व तत्सम काँग्रेसचें राजकारण समरसतेने, पण चिकित्सेने, जाणून घेणारे अभ्यासक प्रत्यक्ष परिस्थितीपेक्षा तात्त्विक विचारप्रणालींत वाहवत जातात व त्यांच्या सिद्धान्तास अवास्तवतेचें स्वरूप येतें. अुद्या हिंदुस्थान फॅसिझमविरुद्ध शस्त्र घेऊन लढूं लागला तरी तेवढ्याने तो अमेरिका-रशियाची सहानुभूति कमावेल (पृ. ११२) हें म्हणणें भोळसट आहे. अितकेंच काय, पण प्रस्तुतचीं युद्ध्यमान राष्ट्रें अेखाद्या तत्त्वास आवाहन करून आम्ही त्यासाठी लढत आहोंत असें जेव्हा म्हणतात तेव्हा तेवढ्यावरून हा तत्त्वनिष्ठांचा झगडा आहे असें समजणें भ्रामकपणाचें होअील. चर्चिलसाहेबांना अेकीकडे अमेरिका व दुसरीकडे रशिया यांच्याशीं स्नेह करतां येतो; अटलांटिक सनद मान्य करून पुनः 'मी साम्राज्याचे तुकडे करण्यास मुख्य प्रधान झालों नाहीं' असें ठासून म्हणतां येतें; पॅलेस्टाअिनमध्ये ज्यू लोकांना छू: करून अरबांशीं सहानुभूति दाखवितां येते हें राजकारणाचें व्यावहारिक स्वरूप आहे. 'राजकारण दुलग असावें' हें अितिहासाचें सूत्र आहे. सरकारला चालू युद्धांत माणसें पुरवा व त्यासाठी सैन्यांत शिरा म्हणणारे अंतर्यामी देशभक्त असणें शक्य आहे ही व्यावहारिक राजकारणाची बाजू श्री. गाडगीळ व तत्सम अभ्यासक पुरेतेपणीं लक्षांत घेत नाहीत असें वाटतें.

धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेमार्फत गेलीं वीस वर्षे प्रसिद्ध होणाऱ्या 'रामदास रामदासी' मासिकांतून हा मजकूर पूर्वीच खंडशः प्रसिद्ध झाला. तो आता ग्रंथरूपाने पुढे येत आहे. रामदास रामदासी मासिक व सत्कार्योत्तेजक सभा मुख्यतः समर्थवाङ्मयास वाहिलेली असली तरी अेका विषयाचें संशोधन करतां करतां दुसरें हातास लागतें तें टाकण्यापेक्षा जगापुढे आणावें या दृष्टीने श्री. देव हे रामदासी वाङ्मयाबरोबर अैतिहासिक कागदपत्रांसहि प्रसिद्धि देत आहेत तें योग्यच आहे. अितिहासाचीं साधनें म्हणून आतापर्यंत अुर्णापुरीं चाळीस हजार पत्रें मराठींत प्रसिद्ध झालीं आहेत. अेवढ्या अुद्योगानंतर तरी त्यांत कांहीं ठराविक प्रकारचा पद्धतशीरपणा यावयास पाहिजे. अुदाहरणार्थ, लेखाचा काल, लेख अस्सल की नक्कल हें स्पष्ट नमूद केलेलें असावें तसें तें या ग्रंथांत आहे. पण त्याबरोबरच प्रत्येक कागदाचा थोडक्यांत सारांश देण्याची पेशवेदप्तराच्या संपादनांतील पद्धत निःसंशय अनुकरणीय आहे. अितकेंच नव्हे तर प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथास अवघड शब्दांचा कोश, निदान तळटीपा, अवश्य हव्या. ग्रंथास परिचयवजा जोडलेली दोन पृष्ठांची प्रस्तावना अगदीच त्रोटक व स्थूल

स्वरूपाची आहे. अुदाहरणार्थ, लेखांक ३९ 'अभ्यसनीय', लेखांक ५७ 'अति महत्त्वाचे अभ्यसनीय' हे त्या पत्रावरील शेरे संशोधनावर कितपत प्रकाश पाडतात कोण जाणे? प्रस्तावना त्रोटक चालेल पण स्थूल नसावी. प्रस्तुत साधनांच्या प्रकाशनाने नेमका अधिक प्रकाश कोणता पडला तें प्रस्तावनेंत सांगणें जरूर आहे. भा. अि. सं. त्रैमासिकाच्या श. १८६३ च्या आषाढ अंकांत संशोधक श्री. गुप्ते यांनी लेखांक ७९ चें संपादन करतांना मोडी वळणाबद्दल जो प्रपंच केला आहे तो श्री. देवांच्या मतें अनवश्यक मानतो (पृ. ३७). अवश्यकता व अनवश्यकता हा मतभेदाचा प्रश्न होअील.

सांप्रदायिक वृत्त, चर्चा यांत विविध विषय आलेले आहेत. त्यांत श्री. चारुचंद्र दत्त यांनी बंगालीमध्ये 'रामदास ओ शिवाजी' हा ३७३ पृष्ठांचा ग्रंथ लिहून तो कलकत्ता युनिव्हर्सिटीतर्फे प्रकाशित केला आहे. ह्याचा अुत्कृष्ट परिचय वाचावयास मिळतो व त्याने त्या ग्रंथांतील मजकुराबद्दल वाचकाची जिज्ञासा अधिक वाढते. बंगाली लोक आम्हा मराठ्यांच्या अितिहासाचा जेवढा अभ्यास करतात तेवढा आम्ही मराठे बंगाली वाङ्मयाचा वा अितिहासाचा करीत नाहीं असें म्हणावेंसें वाटतें. पृ. ७८ वर श्री. शंकरराव देवांनी रियासतकार सरदेसाअी यांच्यावर जी टीका केली आहे ती सांप्रदायिक स्वरूपाची आहे. श्री. माटे, सरदेसाअी, न. र. फाटक ही मंडळी समर्थवाङ्मयावर टीका करतात, तिचें बौद्धिक खंडन केलें पाहिजे. या बाबतींत हळुवार राहून केवळ प्रतिटीका करण्याने वाचकाचें समाधान होणार नाही.

**रा. वि. ओतुरकर**

## स्थलवर्णन

**सज्जनगड—** ले० रा.सा. गं.के. देशपांडे; प्रका० पां.र.अंबिके, पुणें; मूल्य आ. ४.

अितिहासभूषण बाबासाहेब देशपांडे यांनी सज्जनगडाचा जीर्णोद्धार करण्याचें कार्य अंगावर घेतलें असून त्यासाठी 'सज्जनगडा'च्या पायथ्याशीं ते जाअून राहिलेहि आहेत. रामदासस्वामींचा या गडाशीं किती संबंध होता हें सांगण्याचें कारण नाही. बाबासाहेबांनी हें छोटें पुस्तक छापून जास्त माहितीबद्दल अुत्सुकता वाढविली आहे ती त्यांनींच मोठा ग्रंथ लिहून पुरी करावी अशी विनंती आहे.

**चिं. ग. कर्वे**

## काव्य

**१ वऱ्हाडी लोकगीतें—** संपा० पां. श्री. गोरे.

**२ संसार—** ले० सौ. संजीवनी मराठे; प्रका० दा. ना. मोघे, कोल्हापूर.

**३ मधुपर्क—** ले० पु. मं. लाड; प्रका० के. भि. ढवळे, मुंबई ४.

सुमारे पंचवीस वर्षांपूर्वी भा. इ. सं. मंडळाने आपल्या अितिवृत्तांत ओव्या, भोंडल्याचीं गाणीं अित्यादि प्रसिद्ध करून भाषा, समाज, धर्म व संस्कृति यांच्या दृष्टीने लोकवाङ्मयाचें महत्त्व सुशिक्षितांना पटवून दिलें. त्यानंतर ठिकठिकाणच्या विद्वानांनी या प्रकारचें वाङ्मय प्रकाशांत आणण्याचें जें कार्य चालविलें आहे त्यापैकीच अेक प्रस्तुतचा प्रयत्न आहे. राष्ट्राच्या सांस्कृतिक अितिहासांत लोकवाङ्मयास फार महत्त्व असतें. पुढे महाकाव्याचें स्वरूप धारण करणाऱ्या ग्रंथास मूळ आधार त्याचाच असतो असें मानण्यांत येतें. भाषा व संस्कृति या दोहोंच्याहि

दृष्टीने हें वाङ्मय अुपयुक्त असल्याने खेडोपाडीं हिंडून व नानाप्रकारच्या लोकांत मिसळून या 'अपौरुषेय' वाङ्मयाचा संग्रह करणें आवश्यक आहे. श्री. गेरे यांनी अमरावती व यवतमाळ जिल्ह्यांत हिंडून अनेक स्त्रियांच्या तोंडचीं गाणीं अुतरून घेअून त्यांतील ८५ गीतें प्रस्तुत संग्रहांत प्रसिद्ध केलीं आहेत. श्री. य. खु. देशपांडे यांची यास जोडलेली विद्वत्तापूर्ण प्रस्तावना हाहि या संग्रहाचा अेक विशेष आहे.

या लोकगीतांत कांही देवादिकांवर रचलेलीं असून अितरांत पतिपत्नीप्रेम, बंधुभगिनीप्रेम, वात्सल्य अित्यादींचा आविष्कार झालेला आहे. दोन बाअिलांचा संसार, सास्वा-सुना, पाटाची अस्तुरी हे विषयहि यांतून सुटले नाहीत. लग्न, पुत्रजन्म हे मंगलप्रसंग तर अशा गीतांची पर्वणीच होत. स्त्रीहृदय जात्याच भावनाशील, त्यांत वर अुल्लेखिलेले विषय त्यांच्या अत्यंत जिव्हाळ्याचे, या त्यांच्या जिव्हाळ्याच्या विषयांचा त्यांच्याच सोप्या, सरळ आणि रसाळ भाषेंत झालेला आविष्कार अत्यंत अव्याजमनोहर अुतरला आहे. ओवीवाङ्मयाचे सर्व गुण समुच्चयाने या गीतांत आहेत अेवढें म्हटलें म्हणजे पुरे आहे. वानगीदाखल कांही गीतें अुल्लेखिलीं तरी त्यांत डावें अुजवें काढणें कठीणच आहे. दोष काढावयाचाच तर कल्पनांची पुनरावृत्ति अेवढा अेकच येअील, पण त्यामुळे लोकगीतांचा अवीटपणा मुळीच कमी होत नाही.

या लोकगीतांचे महत्त्व काव्याअितकेंच अितर दृष्टींनीहि आहे. सामाजिक चालीरीति व जीवन यांवर यांतून चांगलाच प्रकाश पडतो. नुसत्या स्त्रियांच्या अलंकारांचीच माहिती त्यांत किती तरी मिळते. भाषादृष्ट्याहि त्यांचें फार महत्त्व आहे. हीं गीतें वऱ्हाड-नागपूरप्रांतींचीं असल्याने तेथील भाषेच्या लकबी यामध्ये आढळतात. ण च्या जागीं न येणें किंवा ळ बद्दल य अथवा र येणें, प्रथमपुरुषी तिन्ही लिंगीं वर्तमानकाळीं क्रियापदाचा अेकच 'तो' प्रत्यय असणें अित्यादि विशेष त्यांत दिसतात. माझा माझी — यांबद्दल माहा माही -- अशीं रूपें होतात. हे भाषिक विशेष भाषेचा काल व स्थल या दृष्टींनी अितिहास सांगत असल्याने ते जसेच्या तसेच छापणें आवश्यक आहे. संपादकांनी ही गोष्ट बऱ्याच अंशीं आचरली आहे; पण 'ण' व 'ळ' बद्दल मात्र त्यांनी अपवाद केला आहे. "अखिल महाराष्ट्रीयांच्या सोअीकरिता मुळांतील 'न' आणि 'य'च्या जागीं 'ण' आणि 'ळ' च दुरुस्त करून छापला आहे" (प्र. पा. १०). त्याचप्रमाणे "योग्य ठिकाणीं योग्य ओळी वा शब्द अुपयोजून" त्यांनी हीं गीतें प्रसिद्ध केलीं आहेत. यामुळे काव्यरसिकाची सोय झाली असेल पण लोकगीतांचें भाषिक अभ्यासांत जें महत्त्व आहे त्यास मात्र कांहीसा बाध येतो हें खरें. श्री. गेरे यांनी सहजस्फूर्त आणि सहजसुंदर अशा या वऱ्हाडी लोकगीतांचा संग्रह प्रसिद्ध करून लोकवाङ्मयांत मोलाची भर घातली आहे या-बद्दल त्यांचें अभिनंदन आम्ही करतों.

गं. ब. ग्रामोपाध्ये

मानवी सृष्टीचें केंद्र संसार हेंच आहे. आणि संसाराचा मध्यबिंदु प्रणय ! मग संजी-वनीच्या संसारांत प्रणयालाच प्राधान्य मिळावें यांत नवल कसचें ? पण त्यांत केवळ प्रणयच नाही : मुलेंबाळेंहि नांदत आहेत. अर्थात् हा प्रणयाचाच प्रभाव ! संसाराच्या आत्मीयतेने रंगलेल्या संजीवनीने मधून मधून बाहेरहि दृष्टि फिरविली आहे.

'संसारां'तल्या बहुसंख्य गीतांत जो प्रणय आला आहे तो प्रत्यक्षानुभूतीनेच स्फुरला आहे हें त्या गीतांतील अुत्कटतेने स्पष्ट होण्यासारखें आहे. या गीतांतून ज्या प्रणयच्छटा रंगविल्या आहेत त्यांत विपुल विविधता आहे. प्रत्यक्षानुभूतीचेंच हें चिन्ह होय. तारुण्याच्या

अनुक्रमणिका

'नव-संमोहना'पासून तों 'प्रीती ! हे मायाविनी, जा दूर जाणिवेतुनी' असा तिचा ताप आणि कवयित्रीचा संताप होईपर्यंतच्या सर्व वृत्ति त्यांत प्रतिबिंबित झाल्या आहेत.

श्री. विठ्ठलराव घाटे यांनी प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणे कवयित्री ही संक्रमणकालांतून जात आहे हें खरेंच. गाण्याचें साधन म्हणून कविता करणारी संजीवनी आता आपल्या काव्यानुभवाच्या आविष्काराकरिता गायन हें साधन म्हणून वापरूं लागली आहे हें तर या संक्रमणकालाचें द्योतक आहेच. पण प्रणयाकडे पाहण्याचा तिचा जो दृष्टिकोण या कवितांतून स्पष्ट होत आहे तो या संक्रमणकालाचा अेकमेव विशेष म्हटला पाहिजे. संसाराच्या अुपवनांतच प्रीतिलतेला बहर येतो अशी जी श्रद्धा आपल्या कवींनी अुराशीं धरून ठेविली आहे तिच्याशीं विसंवादी सूर संजीवनीच्या काव्यांत अुमटतांना अैकूं येतो. 'पांखरा' या गीतांत संजीवनी म्हणते :—

'येअुं नको मजसंगें पाखरा !
गुलाम झालें जीवन सारें
खुल्या दिलाचीं मिटलीं दारें,
जुलमाचे हे पाश-पसारे'

यांतील पाखरूं म्हणजे प्रणय हें काय रसिकांस सांगावयास हवें ? तसेंच, 'वसंत' या कवितेंत

'भूत-भविष्याचा राया घालुं नको मेळ'

अशी जी ओळ आली आहे तींत तरी हीच सूचना नाही काय ?

या संक्रमणामुळेच की काय संजीवनी प्रणयाकडे अधिक वास्तववादी दृष्टीने पाहूं लागली आहे. मराठी काव्यांत ओसंडणाऱ्या प्रेमाला तरी अेकच धार आहे. ती म्हणजे आत्मिक (spiritual) प्रेमाची. त्या प्रेमाचा शरीराशीं कांही संबंध आहे याची जाणीव आमच्या कवींना क्वचितच दिसते. आणि ती असली तरी त्या प्रकारचें प्रेम म्हणजे वासनामय प्रेम, आणि म्हणून तें हीन अशी त्यांची श्रद्धा असावी ! वासनामय प्रेम आणि आत्मिक प्रेम असे प्रेमाचे दोन प्रकार आहेत आणि त्यांपैकी अेक हीन आणि दुसरें अुच्च ही विचारसरणी आजच्या मनोविश्लेषणाच्या काळांत तरी कल्पनारम्यच ठरेल. 'संसारां'तील प्रणयगीतांत प्रेमाचीं हीं दोन्ही अंगें रंगवलीं गेलीं आहेत. अर्थात् हें नकळत झालें आहे. म्हणूनच त्यांत मौलिकता आहे. 'स्वप्न-स्मृतीं'त

'स्कंधावरुनी ओढणी गळे, केशपाश शिरिं मुक्त सळसळे
धुंद गोड मम नयनीं तरळे, मज जिंकियलें मदनें पुरतें !'

या ओळींत शरीरहि प्रेमानुभवाला कसें साद देतें याचेंच वर्णन आलें नाही काय ? 'जयमाला' या कवितेंत जपमाळ घेअून येणाऱ्या आपल्या पतीची वाट पाहणारी नोवरी

'अति आतुर संगम-समयाला'

असें तिचें वर्णन करणें यांतच औचित्य नाही काय ? 'सुखाची अतृप्ति' या काव्यांत

'विसावा लाभला जीवा तुझ्या आलिंगनीं अंतीं'
'शृंखला घेअुनी हातीं मदन मज जिंकुनी गेला
वध्य मी अंतरीं तूझ्या लावितें दोष दैवाला'

या ओळी तरी तिचा हाच वास्तववादी दृष्टिकोन दाखवितात.

वास्तववादी दृष्टीने प्रणयाकडे पाहावयाचें म्हणजे प्रणयांतील संकेतांचें मरणच ! कारण वास्तववादी दृष्टीला प्रेमाच्या मर्यादा दिसल्यावांचून राहणार नाहीत. प्रेमाला आत्मसमर्पण हवें, पण या आत्मसमर्पणांत आत्मविकास होतो काय अशी शंका वास्तववादी मनांत तरळणारच. प्रेम चिरकालीन असतें पण वास्तववाद्याला त्याचाहि संशय वाटणार ! कांहीशी अशीच प्रेमाबद्दल वाटणारी अश्रद्धा संजीवनीच्या काव्यांत प्रकट झाली आहे. 'भ्रांति' या गीतांत कवयित्री म्हणते :

'पेटती ही प्रीत अंतीं, सुखें अुरा लावशील
अनुतापें व्यर्थ जीवा, जळशील ! जळशील !!'

'प्राण-पाखरूं' या कवितेतील

'चैतन्याचें चंचल तारूं, कुणी नका हो तया हकारूं'

या ओळींत हाच ध्वनि अुमटत नाही काय ? 'वेडा जीव' याहि कवितेंच हाच ध्वनि

'स्नेह-विकल अेकाकी जिव हा, रात्रंदिन भिरभिरतो वांया'

या ओळींत आणि विशेषतः 'स्नेह-विकल' आणि 'अेकाकी जीव' या शब्दांत अगदी स्पष्ट झाला आहे.

संक्रमणकालांतील अनुभूतीने जेवढ्या कविता लिहिल्या गेल्या आहेत तितक्या बहुतेक अुत्कट, गोड आणि सरस अुतरल्या आहेत. प्रसाद आणि नादमाधुर्यहि त्यांत आहे. पण तद्व्यतिरिक्त ज्या कविता या संग्रहांत आहेत त्यांतल्या पुष्कळांवर शब्दरचनेच्या दृष्टीने तांब्यांची व कल्पनांच्या दृष्टीने टागोरांची दाट छाया पडली आहे. 'जिथे तुजसवें झगमगला दिन', 'सखि प्रतिपळिं अंतर हें अुजळे', 'युगानयुग बसेन पाहत वाट तुझी मोहना', 'चिर-संजीवन', 'करुण-प्रसाधन' या ओळींच्या घडणीवर आणि शब्दांवर तांब्यांची छाप आहे हें सांगण्याची गरज नाही. तसेंच 'पुष्पमाल', 'प्राणानलें', 'तीव्रातपसम', 'जीवित्व', 'चिर-अुदार' यांसारखे शब्द योजिल्याने रचना अनेक ठिकाणीं बोजड व दुर्बोध झाली आहे. हाहि अर्थात् तांब्यांच्याच अनुकरणाचा दोष आहे.

पण ज्या संक्रमणकाळामुळे संजीवनीच्या हातून सुंदर आणि वास्तववादी अशीं प्रणय-गीतें लिहिलीं गेलीं त्याला कुणी झालें तरी धन्यवादच देअील.

ना. मा. सन्त

सुप्रसिद्ध चिकित्सक आणि वाङ्मयाचे गाढ व्यासंगी श्री. पु. मं. लाड यांच्या स्फुट कवितांचा संग्रह 'मधुपर्क' या नांवाने प्रसिद्ध होत आहे. भावगीतांवर लिहिलेला अेक दीर्घ प्रबंधहि या संग्रहास जोडण्यांत आला आहे.

अेक व्यासंगी आणि विचारवंत टीकाकार या नात्याने श्री. लाड यांनी मराठी साहित्यांत मानाचें स्थान मिळविलें आहे. हा त्यांचा लौकिक त्यांच्या काव्याच्या योग्य मूल्य-मापनाला बाधक ठरेल की काय अशी भीति वाटूं लागली आहे. 'चिकित्सक टीकाकाराने सृजनशील वाङ्मय निर्माण करण्याचा हट्ट कां धरावा ?' अशा स्वरूपाचे प्रश्न विचारले जात आहेत. 'ललितवाङ्मयांत 'पडलेला' साहित्यिक टीकाकार बनतो' हा सिद्धान्त तर या

हाकाटीच्या मुळाशीं नसावा ? कसेंहि असलें तरी गद्याकडे आणि टीकेकडे वळण्यापूर्वी श्री. लाड हे कवि होते आणि गद्य प्रांतांत मानाचे करभार मिळविल्यावरहि आज ते कविच राहूं अिच्छितात हीं गोष्ट खचित दखल घेण्यासारखी आहे. टीकाकाराने सृजनशील वाङ्मयाच्या फंदांत पडूं नये अशी हाकाटी करण्याअैवजी गद्यलेखनासारखें आत्मप्रकटीकरणाचें हुकमी साधन मिळालें असूनहि ज्याला काव्यरचनेची जरूरी भासते त्याच्या काव्यसंसाराचें सूक्ष्म अवलोकन केलें तर काव्यप्रकाराचें अेखादें वैशिष्ट्य हातीं लागण्याचा संभव !

'मधुपर्कां'त संकलित केलेल्या छत्तीस कवितांपैकी दहा अेक प्रणयगीतें आहेत. त्यांत 'चार मंगलाष्टकें', 'प्रेमाची अुत्तर-मीमांसा' आणि 'कलहांतरितेची होरी' हीं अुत्कृष्ट आहेत. पावसाळ्यांतील तर्र आणि तुष्ट पार्श्वभूमीवर दोन प्रेमिकांची गांठ पडली. निसर्गाच्या सूचनांनी आणि नायकाच्या हिकमतीनें त्याच्यांतील संकोच दूर होअून त्याचें मीलन घडलें हा कथाभाग कवीने आर्येसारख्या जुन्या वृत्तांत फारच नफाअीदार आणि प्रसादयुक्त शैलीने रंगविला आहे. प्रेमकाव्याकरिता आर्या वृत्ताचा केलेला अितका परिणामकारक अुपयोग पाहण्यांत नाही.

> सांजेच्या काळोखीं ओळख देण्यास काजवे स्फुरती
> तुझिया साडीवरच्या जरिखडिची त्या नये परी सर ती

यांसारख्या ओळी साडीवरच्या जरिखडीप्रमाणेच रसिकांच्या मनःपटावर अुमटून राहतील. 'प्रेमाची अुत्तर-मीमांसा' अेका दृष्टीने अपूर्व आहे. प्रेमाची जीवशास्त्रीय अुपपत्ति लक्षांत घेतां

> 'भृंग दंगती जें मधुरंगें, पुष्प-परागें भरती अंगें
> मधुप योजिले अेविं निसर्गें, ब्रोट मधाचें लावुन कामीं !'

ही निसर्गाची माया मान्य करावी लागेल. पण 'वृथाभिमानी' मानव आपल्या अहंप्रवृत्तीच्या सांत्वनार्थ,

> 'नाशिवंत ही मनांत प्रीती, जनीं पुकारी अमर प्रीती
> सृष्टि-खेळ हा पुरी प्रचीती, मिरास मानी हा अध्यात्मी.'

प्रेमाचें हें स्वरूप व मानवाचें अहंभावयुक्त स्वप्नरंजन हीं जमेस धरलीं तरी प्रेमाचा वैयक्तिक अनुभव

> 'केवळ सत् हें अितर असत् गे, अिथे जागतें क्षणांत चित् गे'

असाच असणार. पण प्रेमभावना ही केवळ वैयक्तिक अनुभवाची बाब असती तर तिला जीवन-संसारांत अितकें अनन्य स्थान लाभलें नसतें. तें प्राप्त होण्याचें कारण :

> 'आदि पुरुष तो होता राजी, आदिस्त्रीच्या विलोमनें, जी
> स्फुरे प्रेरणा, होते ताजी, तीच आज गे ! पुरुष तोच मी !'

या शब्दांत कवीने वर्णन केलेली मानवजाति-अितिहासाच्या अनुभवाची पुनरावृत्तिच होय. 'कलहांतरितेची होरी' या कवितेंत प्रेमानुभवाचा अुन्माद घेण्यास आसुसलेल्या वृत्तीचें अुन्मादी चित्रण आहे. 'फाग', 'होरी', 'डंख', 'अनंग-नाग', गुणगहिने' या जुन्या शाहिरी वाङ्मयांतील शब्दांचा अुपयोग रसोत्कर्षक आणि बहारीचा झाला आहे.

अुरलेल्या कवितांत 'पिसें' हें सुनीत अेक अुत्कृष्ट सुनीताचा मासला म्हणून दाखवितां येअील. पहिल्या बारा ओळींत रंगविलेलें वातावरण भावनाकुल आणि चित्ररम्य आहे. 'पावसाचें अंगाअी-गीत' वात्सल्यपूर्ण अुतरलें आहे. त्यांतील

आमाळाच्या फटींतून, अून हळू निसटून
मोतियें पानावरून, करील गोळा

या ओळी मनांत घोळत राहाव्यात अशाच आहेत. सौंदर्यदर्शनाची जादू सौंदर्यदर्शनानंतर लागून राहणाऱ्या हुरहुरींतच असते याचें चित्रमय दिग्दर्शन 'रातराणी' या कवितेंत अुत्तम झालें आहे. 'ज्ञानेश्वरां'त मराठीच्या अुज्ज्वल परंपरेचा अभिमान तर 'प्रार्थने'त आर्योचा 'सर्वेऽपि सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः' ही सर्व भूतमात्राबद्दलची जिव्हाळ्याची वृत्ति प्रकट झाली आहे. 'मिटल्होल्झर' या कवितेंत त्या धाडसी वीराची हिम्मत त्या छंदांत आणि शब्दांत चांगली व्यक्त झाली आहे.

'स्वातंत्र्य व समता' व 'कविभाअींस' या दोन कवितांत कवि आधुनिक विषयाकडे वळल्याचें दिसतें. पण या काव्यांच्या मागे असलेली प्रतीति आणि तिला काव्यानुकूल करणारा प्रक्षोभ हीं दोन्ही क्षीण वाटतात. जे अनुभव भावनांगानेच प्रतीत होतात तेच काव्यरचनेला अनुकूल असतात. त्या अनुभवांतील भावनेची अुत्कटता छंदसुलभ असते. अनेकदा ती छंद आणि शब्द घेअूनच बाहेर पडते. अशा वेळीं रचना प्रसन्न आणि रसोत्कट होत असेल हें निर्विवाद. पण क्षीण भावनेचे अनुभव काव्यांत गुंफण्याचा प्रयत्न केला की येथे जडपणा, क्लिष्टता आणि नीरसता हीं यायचींच. वरील दोन कवितांत आणि अुरलेल्या कवितांत हाच दोष प्रामुख्याने दिसून येतो.

'मुक्तक आणि भावगीत' हा प्रबंध लेखकाच्या गाढ व्यासंगाची आणि खोल विचारशीलतेची साक्ष देतो. भावगीत हें अिंग्रजी पैदाशीचें आहे हें म्हणणें खोडून काढतांना भावगीताची परंपरा अगदी वेदकालापर्यंत कशी भिडली आहे हें लेखकाने साधार आणि सप्रमाण दाखविलें आहे. या संशोधनाबद्दल मराठीसाहित्य श्री. लाड यांचें ऋणी राहील.

✓ना. मा. सन्त

## कथा-कादंबरी

१ **काशीनाथ**—संपा० भा. वि. वरेरकर; प्रका० नवभारत प्रकाशन संस्था, मुंबअी ४; मूल्य रु. १॥.

२ **अंधारांतील वाट**— ले० बा. भ. बोरकर; प्रका० दा. ना. मोघे, कोल्हापूर; मूल्य रु. २॥.

३ **वेटिंगरूम**—ले० व प्रका० ना. ह. आपटे, कोरेगांव (सातारा); मूल्य रु. १॥.

४ **प्रणय**— ले० गो. के. भट; मूल्य रु. ३॥.

५ **डेक्कन कॉलेजांत**— ले० पु. रा. लेले; प्रका० के. भि. ढवळे, मुंबअी ४; मूल्य रु. २॥.

६ **प्रमद्वरा**— ले० ग. त्र्यं. माडखोलकर; मूल्य रु. २॥.

७ **करुणादेवी**—ले० साने गुरुजी; प्रका० के. भि. ढवळे, मुंबअी ४; मूल्य आणे १०.

८ **शककर्ता शालिवाहन**— ले० ना. के. बेहेरे; प्रका० दि. भा. धुमाळ, नागपूर; मूल्य रु. २॥.

शरद्-साहित्य-मालेंतील 'काशीनाथ' हें दहावें पुष्प आहे. ही अेक कारुण्यपूर्ण भावकथा आहे. अगदी आवश्यक अशाच प्रसंगांच्या पार्श्वभूमीवर 'काशीनाथ' व त्याची पत्नी कमला यांचें जीवनचरित्र अतिशय परिणामकारकपणें रेखाटलें आहे. मूळ कथेचें रचनाकौशल्य

व अनुवादकाची अर्थवाही साधी भाषा यांमुळे पुस्तक आकर्षक झालें आहे. मूळचा गरीब, त्यामुळे लौकिकास पारखा झालेला व ज्ञानानंदांत स्वतःचें मन विसरणारा काशीनाथ योगायोगाने अेका श्रीमंताचा घरजावई झाला. त्या सोनेरी पिंजऱ्यांत त्याच्या मनाचा जास्तच कोंडमारा होअूं लागला. त्याच्या पत्नीचीहि कुचंबणा होअूं लागली. तिने पतीचें मन संसारांत रमविण्याचा पुष्कळ प्रयत्न करून शेवटीं हताश होअून त्याचा धिक्कार केला. परंतु शेवटीं काशीनाथच्या अथांग मनौदार्यापुढे तिचें लौकिक मन पराभूत झालें आणि तिचें पश्चात्तापदग्ध मन वैभवाच्या धुंदींतून जागें होअून काशीनाथशीं अेकरूप झालें. या मुख्य कथासूत्रावर ही भावकथा अुभारली आहे. शरद्बाबूंनी निर्मिलेल्या अनेक अविस्मरणीय व्यक्तींपैकी काशीनाथ ही अेक व्यक्ति आहे. श्री. वरेरकर यांच्या श्रमांमुळे त्या व्यक्तीचा मराठी वाचकांस परिचय होत आहे.

'अंधारांतील वाट': विवाहपूर्व परिचयांत प्राप्त झालेल्या मातृत्वामुळे प्राप्त झालेल्या परिस्थितींत स्त्रीला (कुमारिकेला ?) आपलें जीवन अंधारांत काढावें लागतें. अशा अंधारांतल्या वाटेने जीवन कंठणाऱ्या स्त्रीबद्दल सहानुभूति अुत्पन्न व्हावी आणि ती परिस्थिति निर्माण करणाऱ्या समाजस्थितीबद्दल चीड अुत्पन्न व्हावी अशा हेतूने ही कथा श्री. बोरकर यांनी लिहिली आहे. 'अुपा'च्या अशा जीवनाची हकीगत सांगणारा 'माझीं स्मृतिचिन्हें' हा भाग कादंबरीचा मुख्य कथाभाग असावा. खेडेगांवांतल्या स्वच्छंद वातावरणांत स्वच्छंदपणें वावरत असतां अुपेला अकालींच यौवनसुखाची चव कळली आणि तिचें मूलतः विषयोन्मुख असलेलें मन त्यानंतर जास्तच प्रमत्त झालें. त्यामुळे प्रचलित सामाजिक जीवनांत तिला वाट मिळेना. वैवाहिक जीवनांतहि तिच्या वृत्तींनी तिला स्वास्थ्य लाभूं दिलें नाही. जीवनाच्या अुत्तरार्धांत तिचें मन दमून थकून शान्त झालें. आईचें जीवन असें असल्याने तिच्या मुलाच्या जीवनांतहि कांहीं अडचणी अुपस्थित झाल्या. परंतु त्या अडचणींतून कादंबरींतल्या अितर समंजस पात्रांनी मोठ्या समंजसपणें (?) मार्ग काढला आहे. कादंबरींत विजया व मृदुला या कुमारिकांवरहि असेच प्रसंग आले होते. या सगळ्या कुमारीमातांना कथेंतील प्रौढांनी संरक्षण देअून शेवटीं अेका विचित्र योजनेने त्यांना प्रचलित समाजस्थितींत स्थान मिळवून दिलें आणि अंधारांतून बरीच वाट चालल्यावर हे दुर्दैवी जीव अुजळ माथ्याने समाजांत वावरूं लागले. ही घटना घडवून आणतांना लेखकानें जे हेतु डोळ्यासमोर ठेविले आहेत ते मात्र फारसे पूर्ण झाल्यासारखे वाटत नाहीत. आपल्यांतील विकृत मनोवृत्तींना बळी पडणाऱ्या लोकांबद्दल सहानुभूति वाटते ती त्यांच्यावर कांहीं अन्याय होतो म्हणून नव्हे. समाजस्थितीशीं त्यांच्या यातनांचा फारसा संबंध असेल असें वाटत नाही. कोणत्याहि अगदी आदर्श समाजस्थितींतसुद्धा प्रत्येक व्यक्तीस आपल्या विकारांवर नियंत्रण घालावेंच लागतें. विकारांचें समाधान मिळविण्याचा हट्ट कोणत्याहि समाजास परवडणार नाही. विकारांस बळी पडणाऱ्यांना दयेची याचना करतां येअील. हक्काची भाषा त्यांच्या तोंडीं शोभत नाही. शारीरिक व्याधींनी जर्जर झालेल्यांच्या चुकांची माफी करून समाज त्यांच्यासाठी मोफत रुग्णालयें अुभारतो. तशी मानसिक व्याधींनी पछाडलेल्यांनाहि ही सामाजिक दया मिळेल ! परंतु या कथेंतील प्रमुख पात्रें आपल्या विकृत मनोवृत्तींचें समाधान मिळविण्याचा हक्क आहे आणि समाजाने तो हक्क मानला पाहिजे असा झगडा माजवीत आहेत. त्या वेळीं त्यांना अुपेच्या वडिलांच्याच शब्दांत सांगावें लागेल की समाज असले हक्क जुमानीत नाही. कोणत्याहि समाजरचनेला हें परवडत नाही ! श्री. बोरकर यांनी या पात्रांविषयी हळहळतांना समाजाच्या, अगदी आदर्श समाज-

च्याहि, गरजा लक्षांत घेतल्या पाहिजेत. त्यांच्या भाषाशैलीस कथानकरचनेची चांगली साथ मिळणें जरूर आहे.

'वेटिंगरूम' : कादंबरीच्या मुखपृष्ठांत दडलेला संवादरूपाने लिहिलेला हा अेक निबंध-संग्रह आहे. निबंधात्मक असाहि मजकूर आकर्षकपणें सजविणें हें श्री. ना. ह. आपटे यांचें लेखनकौशल्य मराठी वाचकांस चांगलें परिचित आहे. स्टेशनवर वेटिंगरूममध्ये आकस्मिक-पणें भेटलेले प्रवासी चार पांच तास गप्पा गोष्टी करीत बसले. प्रवासी अनायासें सुशिक्षित व विवेचक असल्यानें त्यांच्या गप्पांत सहज गंभीर विषय आले आणि त्या चर्चेचें हें अेका विशिष्ट हेतूनें संकलन केलें आहे. प्रौढ व सुशिक्षित कुमारिकांच्या जीवनांतील, विशेषतः वैवाहिक, प्रश्नांची अतिशय समतोलपणें छाननी केली आहे. जुनें सांसारिक जीवन वैयक्तिक जीवनाचा कोंडमारा करतें म्हणून 'चूल-मूल' पद्धतीला झिडकारून बाहेर पडलेल्या कुमारिका आता दुसऱ्या टोकाला जात आहेत. पुरुषी जीवनाचें विकृत आकर्षण त्यांच्या जीवनाचा नाश कर-णारें आहे हा गंभीर विचार या संवादांत अुदाहरणादाखल प्रसंग घेअून मांडला आहे. ही आपत्ति टाळण्याचा अेक मार्ग म्हणजे आर्थिक स्वातंत्र्य, समाजसेवा अित्यादि योजना हातीं घेण्यापूर्वी आधीं आपल्या तंत्राने का होअीना पण विवाहबद्ध व्हावें. 'संसारी जीवन यशस्वी करून आयुष्य सार्थकीं लावणें हें मुलींचें पहिलें कर्तव्य आहे' (पृ.९८) हें सुशिक्षित स्त्रियांनीहि लक्षांत घेतलें पाहिजे. गाडी चुकल्यामुळे वेटिंगरूममध्ये पडून राहणाऱ्या प्रवाशाप्रमाणे प्रौढ कुमारिकांना जगावें लागतें. या परिस्थितींतून त्यांनीच समंजसपणें वैवाहिक जीवनाच्या गरजा प्रामाणिकपणें पाहून मार्ग काढला पाहिजे. अशा आधुनिक वेणू-सुधांना श्री. आपटे यांचा कळकळीचा निरोप या वेटिंगरूममध्ये अैकूं येअील. परंतु मुख्य गोम अशी की ज्यांच्या जीवनाविषयी गुंतागुंतीचे प्रश्न अुत्पन्न होतात त्या प्रौढ सुशिक्षित कुमारिका सुधाताअींच्या जातीच्या नसतात ! समाजांत अेकामागून अेक प्रश्न अुत्पन्न करणाऱ्या प्रौढ कुमारिकांचे प्रश्न अितक्या सहज प्रवासांतल्या गप्पागोष्टींत वेटिंगरूममधल्या चार पांच तासांच्या मुक्कामांत सुटतील का ?

'प्रणय' : अैन तारुण्यांत अेखाद्या सुखवस्तु भावनाप्रधान तरुणास अेखाद्या विदेशी तरुणीचा मनसोक्त सहवास मिळाला तर त्याच्या जीवनांत कोणत्या यातना अुत्पन्न होतात तें या कादंबरीवरून आपल्याला समजेल. व्हायव्हा ही तरुणी हिंदु नसल्यानें ती दोन हिंदु तरुणांचा परिचय झाल्यावर त्यांच्याशीं स्वैरपणाने वागते. तो स्वैरपणा तिच्या बाबतींत अगदी नैसर्गिक होता. तरी त्या हिंदु युवकांच्या जीवनांत त्यामुळे आग मडकल्यावाचून राहिली नाही. व्हायव्हासारख्या तरुणींच्या सहवासाने हिंदु माणसाचें समाधान होण्याअैवजी अस्वास्थ्यच माजत जाणार ! या अनावर अस्वास्थ्यालाच प्रेम म्हणतात का ? प्रेमपूर्तीसाठी आपल्या भोवतालचीं कौटुंबिक बंधनें तोडण्यासहि नायक तयार झाला. परंतु शेवटीं व्हायव्हा-च्या वडील बहिणीने त्याचे कान अुपटले. प्रेमपूर्ति हा अेक वैयक्तिक स्वार्थ आहे. त्याच्या मोहाने कौटुंबिक, सामाजिक विरोधाचीं वादळें अुठविण्यांत शुद्ध मूर्खपणाच ठरणार हें त्याला तिने पटविलें. आणि शेवटीं पहिलें प्रेम मनांत दाबून टाकून नायक रूढ मार्गाने जगूं लागला. हा अेका बापाच्या जीवनांतील प्रसंग त्याच्या मुलाच्या जीवनांतील अशाच अेका पेचप्रसंगीं त्या मुलाच्या विदेशी प्रियेस वाचावयास मिळाला अशी कथानकाची रचना लेखकाने केली आहे. व्हायव्हा ही हिंदुसमाजाच्या बाहेरची आहे हें ठरल्या-वर मग तिच्या सहवासांतील प्रक्षोभकारक अनुभवाचें लेखकाने केलेलें विस्तृत वर्णन व

विवेचन वाचकास खोटें वाटण्याचें कारण नाही ! आपल्या समाजांतील स्त्री-पुरुषांच्या सह-वासाबाबतच्या कडक निर्बंधांमुळे तरुण-तरुणींची कुचंबणा होते. त्याविषयींचीं कारुण्यपूर्ण वर्णनें पुष्कळांनी रंगविलीं. आता प्रिया विदेशी असल्यास प्रियकरास मनसोक्त सहवास मिळूं शकतो. परंतु तरी प्रेमपूर्तीसाठी विवाह करतांना प्रस्थापित सामाजिक बंधनें तेथेहि पाठलाग करतातच आणि दीर्घ सहवासानंतर दोघांची ताटातूट होते असा कथावाङ्मयांत जो नवा जमाना आहे त्याचें हें चित्र आहे. कामपूर्ति, प्रेमपूर्ति व विवाह या त्रिकोणाचें हें नवें स्वरूप मराठी जगांत अद्याप बरेंचसें अपरिचित आहे तोपर्यंत तें अद्भुतासारखें वाटतें. परंतु निदान भावी सत्याचा आगाऊ परिचय म्हणून हें वाचून ठेवण्यास हरकत नाही ! व्हायव्हाच्या सह-वासांत अितकें मनसोक्त स्वातंत्र्य ज्या हिंदु तरुणास मिळालें त्यालाहि शेवटीं नामोहरम करणारीं आपलीं कौटुंबिक व सामाजिक बंधनें किती जबरदस्त आहेत असा विस्मय वाचकास वाटल्यावाचून राहत नाही. तसेंच, विवाहपूर्व प्रेमप्रसंगांत झाकून ठेवण्यासारखें काय आहे असें आपल्या भावी पतीस धीराने सांगणारी 'आशा' जातीची तरुणीहि शोधल्यावेरीज दिसणार नाही असें वाटतें. कादंबरींतील प्रसंग आपल्या प्रत्यक्ष जीवनापासून फार दूर आहेत असें वाटल्यामुळे वाचकास कांहीसा स्वप्नरंजनाचाच अनुभव येणार ! हेंच ही अेखादी अिंग्रजी कादंबरी असती तर तारुण्यांतील स्त्री-पुरुषसहवासांतील अुन्मादाचें अत्यंत स्पष्ट व अुद्बोधक स्वरूप, अशा अुन्मादकारी जीवनांतहि आपल्या वृत्तीचा थंडपणा टिकवणारी व्हायव्हासारखी आधुनिक स्त्री प्रेमभंगांतूनहि अुदय पावणारी कर्तव्यनिष्ठुरता व कर्तृत्व अित्यादि गोष्टींच्या परिचयामुळे वाचकांस कांही निराळाच आनंद झाला असता !

'डेक्कन कॉलेजांत': मागील पिढीच्या कॉलेजजीवनाची ही अेक कथा आहे. आजच्या कॉलेजजीवनाच्या मानाने मागील पिढीचें कॉलेजजीवन कितपत निराळें होतें हें अजमाव-ण्याचा विचार आजच्या वाचकाच्या मनांत येत राहणारच. त्या पिढीच्या अेकंदर जीवित-विषयक दृष्टिकोनाची बरीचशी कल्पना येण्यास ही कादंबरी चांगली अुपयोगी पडेल. कॉलेजां-तील जीवनाची ही कथा सांगतांना सत्य व असत्य यांचें मोठें मजेदार मिश्रण लेखकाने केलें आहे. कांही अुल्लेख अगदी प्रसिद्धपणें सत्य आहेत त्यामुळे अितर ठिकाणींहि आपण शंभर टक्के सत्यच वाचीत आहोंत असें वाटतें. यामुळे रचना, निवेदनपद्धति अित्यादि गोष्टी अगदी बेताच्या असल्या तरी कादंबरी (?) वाचनीय झाली आहे. त्या काळच्या कॉलेजतरुणांबरोबरच त्यांच्याच सामाजिक थरांत वावरणाऱ्या तत्कालीन तरुणींच्याहि जीवनाचा बराचसा परिचय या कादंबरींत होतो. अेकाच सामाजिक थरांत असणाऱ्या तरुण-तरुणींच्या जीवनांत त्या वेळीं किती तरी अंतर होतें. तेव्हा अद्याप युवकांच्या मानाने आधुनिक जीवनाच्या वाटेवर युवती दोन पावलें मागेच आहेत याचें आश्चर्य वाटावयाचें कारण नाही. हा आपल्या सामाजिक जीवनक्रमाचा परिणाम आहे. त्या जीवनक्रमाचें अुद्बोधक दर्शन या कादंबरींत होतें.

'प्रमद्वरा': मध्यंतरींच्या अेकदोन कादंबऱ्यांमुळे बरीच खळबळ माजल्यानंतर श्री. माडखोलकरांनी ही नवीन कादंबरी लिहिली आहे. परंतु नांव व मुखपृष्ठ यांखेरीज या काद-बरींत तसें विकृत मनाच्या अुन्मादासारखें कांही नाही हें मुद्दाम नमूद केलें पाहिजे. मुख-पृष्ठाच्या बाबतींत कथानकाशीं अितकी विसंगति प्रथितयश लेखकांनीहि कां पत्करावी तें समजत नाही. असो. कथानक प्रचलित राजकीय घडामोडींच्या पार्श्वभूमीवर रंगवलें आहे. पार्श्वभूमीचा व त्यावरील चित्राचा रंग अितका सारखा आहे कीं हें अेक समोर घडणाऱ्या सत्याचें सरळ निवेदन– वृत्तान्तकथन– आहे असें वाटतें. आजच्या राजकीय क्षेत्रांत अज्ञात

राहून राज्ययंत्रास विरोध करणारे व राज्ययंत्राशीं कांहीं करारमदार झाल्यासारखे प्रकटपणें सहकार्य करणारे असे कार्यकर्त्यांचे दोन पंथ कादंबरींत रंगवले आहेत. दोन्ही पंथांचे कार्यकर्ते अेकाच कुटुंबांत दाखवून पेचप्रसंगास अुठाव दिला आहे. राजकीय विचारप्रवाहाचीं विविध विवेचनें ठिकठिकाणीं आहेत. सरकार व जनता यांचा लढा कांहीं प्रसंगीं किती तीव्रता पावत आहे याची स्पष्ट कल्पना येणारे प्रसंग आहेत. परंतु शेवटीं ज्या राजकीय पंथाचा किंवा मार्गाचा लेखकानें पराजय घडवून आणला आहे त्या मार्गाविषयींचें विवेचन कांहींसें त्राग्यासारखें वाटतें. कोंडमारा असह्य होअून पत्करलेल्या मार्गाची चीड येणें निराळें आणि त्या मार्गांतच असलेल्या मूलभूत दोषांची खात्री पटल्यावर तो त्याज्य ठरणें निराळें ! कादंबरीचें पर्यवसान कांहींसें पहिल्या प्रकारचें झालें आहे.

'करुणादेवी' : साने गुरुजी यांच्या लेखणींतून अुतरलेलें हें नवें पुस्तक आहे. गुरुजींची अत्यंत चित्तवेधक कथनपद्धति व त्यांतच कांहीं निश्चित तत्त्वांचा स्पष्टपणें केलेला पुरस्कार हे त्यांच्या लेखनाचे गुण याहि पुस्तकांत आहेत. जनतेंतील सहकार्यवृत्तीचें सामर्थ्य दाखवून त्या अनुरोधानें लेखकानें राज्यकर्तव्याची चिकित्सा केलेली आहे. तात्त्विकदृष्ट्या या गोष्टी समर्थनीय वाटतात हें खरें, परंतु करुणेसारखीच्या जीवनक्रमांत त्या तत्त्वज्ञानाचा प्रभाव प्रत्यक्ष अनुभवास फारसा येत नाहीं अशी तक्रार गुरुजींचे वाचक केल्याशिवाय राहणार नाहींत. परंतु हृदयपालटाच्या तत्त्वज्ञानावर गुरुजींची निष्ठा अद्याप अढळ असल्यानें या तक्रारीचा फारसा अुपयोग नाहीं. विशेषतः विद्यार्थिवर्गांत त्यांनीं मिळविलेली अभूतपूर्व लोकप्रियता पाहिली कीं त्यांच्या लेखनांत भावनेपेक्षा चिकित्सेला जास्त जागा मिळणें अत्यंत आवश्यक आहे असें वाटतें. नाहीं तर तरुणांचें स्वप्नरंजन करून त्यांना झुलवीत ठेवणाऱ्या लेखकांचें आज जसें झालें आहे तसेंच गुरुजींच्याहि पंथाचें होओील अशी भीति नमूद करणें जरूर वाटतें. आर्य-संस्कृतीविषयीं त्यांच्या मनांत असलेल्या श्रद्धेच्या सामर्थ्याची जोड ज्याला नसेल त्याला त्या पंथांत भोळ्याभाबड्या भक्तिभावाखेरीज हातीं कांहीं लागणार नाहीं.

गं. भा. निरंतर

'शककर्ता शालिवाहन' : प्रो. ना. के. बेहरे यांनी चालू सालीं विक्रमसंवत्सराच्या द्विसहस्रमहोत्सवाचा मोका साधून हें अैतिहासिक कादंबरीवजा पुस्तक प्रसिद्ध केलेलें दिसतें. शककर्ते विक्रमादित्य आणि शालिवाहन यांच्या व्यक्तिकालनिश्चितीबद्दल अैकमत्य नाहीं. शालिवाहनानें शक निर्माण केला याबद्दलहि निश्चित पुरावा नाहीं. शक लोक आणि शालिवाहन यांच्या संबंधाविषयींहि कोठे स्पष्टता नाहीं. तसेंच महाराष्ट्रांत शालिवाहन शक कां चालतो व चालावा याविषयीं कोणी साधार माहिती देत नाहींत. 'संशोधकांना प्रेमाचा नम्र अहेर' या प्रकरणांत बेहऱ्यांनीं संशोधकांची कानअुघाडणी जी केली आहे ती खुद्द त्यांनाहि लागू असली पाहिजे. शब्दव्युत्पत्तीची ओढाताण करून त्यांनींहि नवीन घोटाळे अुत्पन्न केले आहेत. शक्ति-कर्ण– शक्तकर्णी– सातकर्णी– सातवाहन– शातवाहन– सादिवाहन– शालिवाहन अशा वर्ण-प्रक्रिया लावून शालिवाहनाचा शक आणि शाक्तपंथ तसेंच कर्णी म्हणजे कानीनपुत्र, मातृ-वंशपरंपरेंतील वगैरे नवीन 'प्रकाश' अितिहासावर टाकले आहेत. शालिवाहन हा विक्रमाचा प्रपौत्र असें म्हणण्याला आधार काय ? "शाक्तपंथ व छाकटे लोक हीं शकांचीं महाराष्ट्रांत अुर-लेलीं नाममात्र स्मारकें होत," हें कशावरून ! 'त्र्यंबकगीर' यांतील 'गीर' संस्कृत 'गुरु' शब्दापासून व्युत्पादून या व्यक्तीला शालिवाहनाच्या गुरुस्थानीं बसविलें आहे. गिरी, पुरी, अरण्य अि० दसनामगोसाव्यांच्या शाखा त्यांना माहीत नसतील असें कसें म्हणावें ! असो.

नुसती कादंबरी या दृष्टीने पाहावें तर तींतील 'प्रकृतिपर्व' ललितवाचकांना कळण्याजोगें नाही. प्रचलित राजकारण त्यांच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे यांतहि डोकावतें आहे. हें पुस्तक पाहून अेवढें वरीक वाटतें की शालिवाहन आणि विक्रम यांच्यावर चांगले ग्रंथ निघाले पाहिजेत.

चिं. ग. कर्वे

## नाटक

**नव्या वाटा**–– ले० आनंदीबाअी किर्लोस्कर; प्रका० किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी; मूल्य रु. १.

सौ. आनंदीबाअी किर्लोस्करांनी लिहिलेल्या 'नव्या वाटा' या तीनअंकी नाटिकेंत विवाहसंस्थेंतील दोषांचें दिग्दर्शन करून त्या दोषांमुळे अुत्पन्न होणाऱ्या आपत्तींतून बाहेर पडण्यासाठी 'नवी वाट' दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. नाटिकेची नायिका रेखा म्हणते, "किती निरुपयोगी झाली आहे आपली ही विवाहसंस्था!" (१७) निरुपयोगी झालेल्या या विवाहसंस्थेला सुधारण्यासाठी 'लग्न मुलांमुलींच्या पसंतीनं झालीं पाहिजेत' असा अवंतीबाअी अुपाय सुचवितात. मुलांमुलींना अेकत्र यावयास वाव नसल्यामुळे या आपत्ति ओढवतात असें निदान झाल्यामुळे अवंतीबाअी 'परिचयमंडळ' स्थापन करण्याची सूचना करितात. यायोगें 'लग्नेच्छु मुलांमुलींचा अेकमेकांशीं परिचय होअील' असा त्यांना विश्वास वाटतो. या परिचयमंडळांत 'वादविवाद, सहली, खेळ असे मनोरंजक कार्यक्रम ठेवावयाचे अन् जबाबदार अशा प्रौढ मंडळींनी त्यांवर देखरेख ठेवावयाची." (१७)

ही परिचयमंडळाची कल्पना खरोखरच चांगली आहे यांत शंका नाही. सध्याच्या सहशिक्षणाने जे प्रश्न सुटूं शकत नाहींत किंवा मुलांमुलींच्या परस्परपरिचयाला जे अडथळे येतात त्यांतून बाहेर पडावयास हा अेक मार्ग आहे. परिचयमंडळाच्या या कल्पनेचें डब्ल्यू. एफ्. कनिंगहॅमनें सुचविलेल्या co-recreation च्या कल्पनेशीं फार साम्य आहे.— ( a well-planned and well-conducted programme of co-recreation free from the distractions and dangers of co-education) कनिंगहॅमच्या मताप्रमाणे या परिचयमंडळावरहि जबाबदार प्रौढ मंडळींची देखरेख राहण्याची कल्पना आहे.

अशा प्रकारें विवाहाच्या मार्गांत सध्या ज्या अडचणी येतात त्यांतून बाहेर पडण्याची ही अेक 'नवी वाट' लेखिकेने दाखविली आहे. पण ही नवी वाट खुलून दिसण्यासाठी पुढे रा. ब. बाबासाहेब अेका खानावळवालीच्या आचरट व छचोर मुलीशीं लग्न करितात व सदर खानावळवाली बाबासाहेबांच्या रेखा या सुशिक्षित मुलीचा खूप छळ करून शेवटीं तिला रंगराव या पाजी मवाल्याच्या गळ्यांत बांधावयाचें ठरविते या ज्या दोन घटना लेखिकेने कल्पिल्या आहेत त्या बऱ्याचशा अतिरंजित आहेत असें म्हणावेंसें वाटतें; आणि अखेर बाबासाहेबांची दुसरी पत्नी चंद्रा (खानावळवालीची कन्या) रंगरावाबरोबर 'अुडून' जाते हा प्रसंग तर बराचसा मेलोड्रॅमॅटिक वाटतो.

रेखेसारख्या सुशिक्षित मुलीने म्हाळसाबाअींने केलेला छळ निमूटपणें कसा सहन केला याचें नवल वाटतें. अवंतीबाअींसारखी समाजसुधारक बाअी मदतीस असतांहि तिची अगदी 'सुशील यमुने'ची अवस्था कां व्हावी हें कळत नाही. आणि गंमत ही की रेखा-रंगराव-विवाह रा. ब. बाबासाहेबांनाहि पसंत पडला (२६). रा. ब. स्वतः अेक वेळ चूक करतील हें मान्य केलें तरी स्वतःच्या सुशिक्षित मुलीचें लग्न अेका मवाल्याशीं लावण्याची तयारी दाख-

वितील हें खरें वाटत नाही. प्रथमपासूनच त्यांची वृत्ति या प्रकारची दाखविली असती तर हा प्रसंग कांहीतरी अुचित वाटला असता पण लेखिकेने ही खबरदारी घेतली नसल्यामुळे हें सारें चमत्कारिक वाटतें.

परिचयमंडळामुळे 'कुमारिकांच्या आयुष्यांतील विवाहाचा प्रश्न सोपा केला' असला तरी ज्या अितर अनेक अडचणी अुत्पन्न होण्याचा संभव आहे त्यांचा विचार करण्याची जबाबदारी नाटिकेंतील कोणीहि व्यक्ति घ्यावयास तयार नाही. पण लेखिकेने आणखी अेक 'नवी वाट' दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. पहिला नवरा जिवंत असतांना यमू दुसरें लग्न करते ही ती 'नवी वाट' आहे. या वाटेचा पुरस्कार यमू पुढीलप्रमाणे करते—"ज्या प्रेमाच्या पायावर पुढं सारी अिमारत अुभी राहायची, तें प्रेमच जर नवराबायकोंत नसलं किंवा पुढं नाहीसं झालं तर संसार सुखी व्हायचे कसे?" (६८) प्रेम हें केव्हा आणि कोणत्या कारणामुळे नष्ट होअील याचा कांहीच भरवसा नसल्यामुळे या नव्या वाटेंतून आणखी अेखादी नवी वाट शोधण्याची आपत्ति ओढवण्याचा मात्र बराच संभव आहे.

सखू मोलकरणीचें पात्र रंगवितांना लेखिकेने बरेंच कौशल्य दाखविलें आहे. अेकंदर भाषा बरी आहे.

रा. शं. वाळिंबे

## लघुकथा

१ ठिणग्या आणि टिकल्या— ले० मा. कृ. शिंदे, मुंबअी.

२ लढवय्ये— ले० गं. ल. पुजारी; प्रका० दि. मा. घुमाळ; नागपूर प्रकाशन, सीताबर्डी, नागपूर; मूल्य रु. ३.

३ ठिणग्या— ले० य. गं. वझे; प्रका० ल. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, पुणें २; मूल्य रु. १॥

'ठिणग्या आणि टिकल्या' हा श्री. मा. कृ. शिंदे यांचा लघुकथासंग्रह आहे. श्री. शिंदे हे रूढ सामाजिक आणि आर्थिक परिस्थितीविरुद्ध बंड करूं अिच्छिणारे अेक प्रचारवादी लेखक आहेत. समाजांतील 'ढोंगबाजी', 'देवबाजी', देअुळबाजी अित्यादींवर त्यांनी प्रस्तुत संग्रहांतील कथांतून तीव्र प्रहार केले आहेत. 'विकलेला देव' या पहिल्याच कथेंतील नायक 'पोट न राखतां फक्त गरिबांची पाठच राखणाऱ्या देवाला' बाजारांत विकून आपलें पोट भरतो. देव गरिबांची काळजी करीत नसून गरीबच देवाची काळजी करितात आणि श्रीमंतांनी देवळें बांधावीं तीं स्वतःच्या पापांचें परिमार्जन करण्याकरिताच बांधावीं असें प्रस्तुत कथेंतील संभूचें म्हणणें आहे. 'देवळांत चमत्कार' या कथेंत देखील पवित्र देवस्थानाचा कसा दुरुपयोग होअूं लागला आहे हें दर्शविलें आहे. हिंदुस्थानांतील सगळीं देवळें जमीनदोस्त करून त्यांतली मालमत्ता गोरगरिबांना वांटून टाकली तर हिंदुस्थानांत गरीब हा शब्द सुद्धा राहणार नाही असा लेखकाला भरवसा वाटतो. गरीबांविषयी लेखकाला वाटणारा कळवळा 'रानमांजर' या गोष्टींतहि व्यक्त झाला आहे. श्री. शिंदे यांनी या ठिणग्या कांही अेका हेतूने लिहिल्या आहेत. '........पांचपन्नास वर्षांनी जी अेक मंदिरबंदीची क्रांतिकारक चळवळ सुरू होअील, किंवा व्हावी असें मला वाटतें, त्यासाठी पार्श्वभूमि तयार करणें हा माझा हेतु आहे' अशी कबूली त्यांनी सुरवातीसच दिलेली आहे. सामाजिक आणि आर्थिक विषमतेबद्दल वाटणाऱ्या चिडींतून जरी वरीलसारख्या कथा निर्माण झाल्या असल्या तरी त्यांच्या जोडीला 'स्त्रियांची चळवळ' आणि 'झुणका भाकर' यांसारख्या विनोदी कथाहि प्रस्तुत संग्रहांत आढळतात.

श्री. गं. ल. देवपुजारी यांनी मोपासां या फ्रेंच लघुकथालेखकाच्या तेवीस कथा निवडून त्यांतील कांहींचीं भाषान्तरें आणि कांहींचीं रूपान्तरें 'लढवय्ये' या कथासंग्रहांत प्रसिद्ध केलीं आहेत. १८७०-७१ च्या फ्रँको-प्रशियन युद्धाच्या पार्श्वभूमीवर लिहिलेल्या आणि विशेषतः प्रशियन सैनिकांच्या पाशवी अत्याचारांवर लिहिलेल्या या कथा हृदयाला पिळवटून काढणाऱ्या आहेत. निवडलेल्या तेवीस गोष्टींतील सारी स्त्री-पुरुषसृष्टि विषयलोलुप आहे. आहार-निद्रादि गरजा या माणसाच्या मूलभूत गरजा आहेत. स्थलकालाचीं बंधनेंहि त्या फारशा मानीत नाहीत. मनुष्याच्या या मूलभूत प्रवृत्तींचें सूक्ष्मपणें अवलोकन करून मोपासांने आपली कथासृष्टि रंगविली आहे. श्री. देवपुजारी यांनी मोपासांच्या कथेचा परिचय मराठी वाचकांना करून देण्याचा स्तुत्य प्रयत्न केला आहे. पण त्यांनी निवडलेल्या या कथांमुळे मात्र मोपासांच्या अितर कथा न वाचलेल्या मराठी वाचकांचा मोपासांबद्दल गैरसमज होअील कीं काय अशी भीति वाटते. प्रस्तुत कथांतूनच आहारनिद्रादींतील चवथी भूकच प्रामुख्याने थैमान घालतांना दिसते. 'लघुकथेचा सर्वोत्कृष्ट प्रणेता' अशी अमर पदवी मिळालेल्या मोपासांने मानवी मनाचे अनेक कप्पे हळुवार हाताने आपल्या कथांतून अुघडून दाखविले आहेत. श्री. देवपुजारी यांनी अशा कांही कथांचा अनुवाद करून पुढील संग्रह प्रसिद्ध करावा म्हणजे समग्र मोपासां कसा आहे याची कल्पना मराठी वाचकांना येअील.

सनातन रूढींवर ज्या हिरीरीने श्री. मा. कृ. शिंदे तुटून पडतात त्याच हिरीरीने श्री. वझे नवमतवादाखाली गणल्या गेलेल्या कांही प्रवृत्तींवर आपल्या 'ठिणग्यां'तून हल्ला करतात. 'बालहत्या', 'ब्रह्म तेथे माया' आणि 'कुमारी गिरिजा' या कथांची याबाबत साक्ष काढतां येईल. सुशिक्षित स्त्री मातृत्वाला पारखी होते असा श्री. वझ्यांचा दावा दिसतो; स्त्री-पुरुषांच्या समानतेमुळे आणि व्यक्तिस्वातंत्र्यामुळे विवाहसंस्थेला कीड लागेल अशी त्यांना धास्ती वाटते; लैंगिक वाङ्मयाच्या धंदेवाअिक आणि बेजबाबदार प्रसारामुळे तरुण पिढी वाहवत जाअील कीं काय अशी त्यांना शंका येते; 'तरुण पिढीच्या चांगल्या प्रवृत्तींना फुंकर घालण्याची बुद्धि आणि पात्रता' शिक्षक-प्राध्यापकांत अुरली नाही अशी त्यांची ठाम समजूत झालेली दिसते, आणि साहित्यिकांनी समाजाला मार्गदर्शन करण्याअैवजी 'तमासगिरां'ची आणि 'लळित्यां'ची भूमिका पत्करली आहे असा त्यांचा आरोप आहे. केवळ पांढरपेशा समाजांत आढळणाऱ्या या साऱ्या गोष्टींचा श्री. वझे यांनी टीकात्मक आणि अुपहासात्मक कथा लिहून खरपूस समाचार घेतला आहे. कुणाहि व्यक्तीशीं आपला हेवादेवा नसल्याचा आणि व्यक्तींना आपण ओळखतच नसल्याचा निर्वाळा ते आपल्या निवेदनांत देतात. परंतु वर अुल्लेखिलेल्या अभिप्रेत व्यक्तींचे चेहरे सुतराम् स्पष्ट दिसतात. चेहरे स्पष्ट होतात म्हणून त्यांच्या अुपहासकथांना गौणत्व येतें असें नव्हे; किंबहुना तसें न होअील तर त्यांतील निम्में स्वारस्य कमी होअील. पण प्रश्न आहे तो हा कीं त्यांना बेचैन करणाऱ्या या गोष्टी अपवादात्मक आहेत कीं समाजांत सरसहा आढळणाऱ्या आहेत ? कोणत्याहि समाजाच्या कुठल्याहि अवस्थेंत नवे जुने असे दोन वर्ग नेहमीच असणार असें निवेदनांत तेच कबूल करतात; आणि हें नवें जुनें तपासून पारखून त्यांतील श्रेय आणि प्रेय कोणतें हें निश्चित ठरवून मग तें समाजाला सांगावें; तोंपर्यंत आपलें साहित्य, तत्त्वज्ञान आणि समाजकारण म्हणजे केवळ ध्येयहीन प्रयोग असें त्याचें म्हणणें. जुन्यांतील अहितकारक गोष्टींचा त्याग आणि नव्यांतील श्रेयस्कर गोष्टींचा स्वीकार डोळसपणें करणें जरूर आहे असें ते मान्य करतात; पण आपल्या अुपहासात्मक कथेला विषय निवडतांना मात्र जुन्याकडे

डोळेझाक करून नव्यावरच ते डोळे वटारतात याचें नवल वाटतें. नव्याला जशीं कांहीं कटु फळें येअूं पाहतात तशीं जुन्याचींहि कांहीं मुळें किडूं लागलीं आहेत त्याची दखलहि रा. वझे यांनी धरणें जरूर आहे. निवेदनांत आपल्या टीकाकारांना अुत्तर म्हणून या गोष्टींचा त्यांनी वाद जर केला नसता तर अुलट 'संदेश' देअून 'सुधारणा' करूं अिच्छिणाऱ्या साहित्यिकाप्रमाणे स्वतःहि पण अेक 'संदेश'च देत आहेत हा आरोप त्यांजवर आला नसता. अुपहासकथा या दृष्टीने प्रस्तुत संग्रहांतील कथा चांगल्या वठल्या आहेत. व्यक्तीअैवजी प्रवृत्तिच टीकाविषय असेल तर अुपहासकथा कशी सरस अुतरते याचें अुदाहरण म्हणून 'रीगलमधील रीटेक' या कथेकडे बोट दाखवितां येअील. 'जोशीबुवांनी सांगितलेली गोष्ट' स्वतः जोशीबुवांच्या तोंडून अैकलेल्यांना देखील पुनः वाचावी असें वाटेल. 'सत्तेचाळीसावी मुलगी' हीहि या संग्रहांतील अेक अुत्कृष्टपैकीं कथा आहे. श्री. वझे हे अेखाद्या प्रश्नाचें गंभीरपणें आणि हळुवार हाताने देखील चित्र रेखाटूं शकतात याची या गोष्टीवरून खात्री वाटते. परिणामकारक भाषा लिहिण्यांत श्री. वझे यांचा हातखंडा आहे. प्रस्तुत 'ठिणग्यां'तून श्री. वझे यांनी 'न बोलायच्या गोष्टीं'चाच पुढचा हप्ता दिला आहे. अुपहासकथालेखक म्हणून प्रस्तुत संग्रहांत त्यांनी पुढचा टप्पा गांठला आहे; आणि व्यक्तींअैवजी त्यांमागील प्रवृत्तींवरच त्यांनी आपलें लक्ष्य वेधलें तर अखेरचा टप्पा त्यांना दूर नाही असा भरवसा वाटण्यास प्रस्तुत संग्रहांत भरपूर जागा आहे.

गं. ब. ग्रामोपाध्ये

## शिक्षणशास्त्र

**१ शैक्षणिक मानसशास्त्र**— ले० प्रि. शं. ब. सुखटणकर, सि. ज्यु. रू. ट्रे. कॉलेज, सातारा; प्रका० सौ. लीलावती सुखटणकर, सातारा; मूल्य रु. २॥.

**२ शिक्षकांशीं हितगुज**— ले० प्रि. शं. ब. सुखठणकर, सि. ज्यू. रू. ट्रे. कॉलेज, सातारा; प्रका० सौ. लीलावती सुखटणकर, सातारा; मूल्य १३ आणे.

**३ बालमनाचें रहस्य**— ले० भास्कर धोंडो कर्वे, अध्यापिकाशाळा, हिंगणें; प्रका० के. भि. ढवळे, मुंबअी ४; मूल्य १। रु.

प्राथमिक शिक्षकांच्या अध्यापनशाळांत 'शिक्षणशास्त्र' हा विषय अत्यंत महत्त्वाचा समजला जातो. याच विषयांत 'शैक्षणिक मानसशास्त्रा'चा समावेश होत असून मानसशास्त्राचें सर्वसामान्य ज्ञान शिक्षकांना असावें या हेतूने या विषयाचा अभ्यासक्रम आंखण्यांत आला आहे. शिक्षणखात्याने सध्या आंखलेला अभ्यासक्रम अगदींच त्रुटित व 'ताकापुरतें रामायण' स्वरूपाचा असल्यामुळे मानसशास्त्राचें, सामान्य ज्ञान का होअीना, पण संपूर्णतया विद्यार्थ्यांच्या पदरीं पडत नाही. प्रि. सुखटणकर यांनी आपलें पुस्तक हा तुटक अभ्यासक्रम दृष्टीसमोर ठेवून लिहिलें आहे व त्यांत यथाशक्ति पूर्णत्व आणण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे. ट्रेनिंगच्या दुसऱ्या वर्षाच्या परीक्षेस बसणाऱ्या विद्यार्थ्यांस या पुस्तकाचें फार मोठें साहाय्य होअील.

अेकंदर पुस्तकाची भाषा साधी व सोपी असल्यामुळे पुस्तक वाचतांना भाषेची अडचण वाटत नाही. मानसशास्त्रीय तत्त्वें पटविण्यासाठी लेखकाने ठिकठिकाणीं दिलेलीं अुदाहरणें दररोजच्या व्यवहारांतील आहेत. त्यामुळे ती ती गोष्ट वाचकाच्या मनाला चटकन पटते. मात्र वाक्यरचनेचे दोष, अशुद्ध मुद्रितें, पारिभाषिक शब्दांच्या अुपयोगांत दिसून येणारा सैलपणा, प्रसंगवशात् अिंग्रजी पद्धतीवर गेलेली वाक्यरचना या गोष्टी परीक्ष्य विद्यार्थ्यांच्या दृष्टीने तितक्याशा महत्त्वाच्या नसल्या तरी शास्त्रीय ग्रंथ या नात्याने दोषास्पदच ठरतील.

'शिक्षकाशीं हितगुज' हें पुस्तक प्रि. सुखटणकर यांच्या लेखणींतून अुतरलेलें आहे. याचाहि अुपयोग ट्रेनिंगच्या परीक्षांसाठी व्हावयाचा असल्यामुळे ट्रेनिंग घेणाऱ्या शिक्षकांनी या पुस्तकाचें आस्थापूर्वक अध्ययन करणें हितावह ठरेल. अिंग्रजी मार्फतहि यासारख्या नांवाचें अेक पुस्तक आहे. पण आपल्याकडे शिक्षणशास्त्राचा मराठी अवतार नुकताच होअूं लागला असल्या-मुळे अिंग्रजी पुस्तकांतील विषय व प्रि. सुखटणकर यांच्या पुस्तकांतील विषय यांत फार मोठें अंतर आहे. प्रि. सुखटणकरांनी आपलें पुस्तक खेडेपाडीं काम करणारे शिक्षक व त्यांपुढे वर्गा-ध्यापनाच्या वेळीं हरघडी अुभ्या राहणाऱ्या अडचणी या ध्यानांत घेअून लिहिलें आहे. भाषासरणी सोपी व समर्पक अुदाहरणें यांमुळे हेंहि पुस्तक अुपयुक्त ठरल्याविना राहणार नाही.

प्रि. सुखटणकरांनी आपली शिक्षणक्षेत्रांतील तपस्या पुस्तकरूपाने सुफलित केल्यामुळे प्राथमिक शिक्षक त्यांना धन्यवाद देतील.

वरील दोन्ही पुस्तकांहून भिन्न स्वरूपाचें 'बालमनाचें रहस्य' हें पुस्तक प्रा. मा. धों. कर्वे यांनी वाचकांसमोर ठेविलें आहे. प्रस्तुत पुस्तक डॉ. सुझान् अैझाक्स् कृत 'अेज्युकेशन अिन् दि नर्सरी' या लोकप्रिय अिंग्रजी पुस्तकाच्या आधारें लिहिलें आहे. त्यांतील अेकंदर विचारसरणी व प्रायोगिक भाग हे पाश्चात्य देशांतील आहेत. असें असलें तरी मुलांची योग्य जोपासना करूं अिच्छिणाऱ्या अिकडच्या मातापितरांना हें पुस्तक फार अुपयुक्त आहे. बाळांचा शारीरिक व मानसिक विकास कसा होतो, त्या बाबतींत वडिलधाऱ्या मंडळींनी कोणती काळजी घेतली पाहिजे, मुलांच्या भावनांचें शुद्धीकरण करण्यांतच मुलांचें भावी सुख कसें अवलंबून आहे अित्यादि बालसंगोपनाचे व्यावहारिक प्रश्न प्रस्तुत पुस्तकांत चांगल्या रीतीने विवेचिले आहेत, व त्यामुळेच हें पुस्तक सुजाण व्यक्तींनी वाचल्यास बराच फायदा होण्याजोगा आहे.

काश्यप

---

# बृहन्महाराष्ट्रीय साहित्यवार्ता

## गुजरात

**अमदावाद**— महाराष्ट्र समाजातर्फे ता. ३१।१२।४३ ते २।१।४४ पर्यंत श्री. प्र. के. अत्रे यांच्या अध्यक्षतेखाली **'मराठी रंगभूमि शताब्दपूर्ति'** अुत्सव साजरा झाला. त्या वेळीं सं. संशयकल्लोळ नाटकाचा प्रयोग करून दाखविण्यांत आला. त्याचप्रमाणे ता. २३।१।४४ दिवशीं **'२५ वा गडकरी स्मृतिदिन'** साजरा झाला. त्या वेळीं भाषणें, काव्यगायन, नाट्य-प्रवेश यांचा कार्यक्रम झाला. श्री. वसंत हेबळे (कुसुमाकर) यांचा **'पुष्करिणी'** काव्यसंग्रह प्रसिद्ध झाला.

**वडोदें**— ता. ६-७।२।४४ रोजीं श्री. प्र. के. अत्रे यांच्या अध्यक्षत्वाखाली वाङ्मय-परिषद् भरणार आहे.

ना. ग. जोशी

## मराठवाडा

**मराठी मंडळ**— गेल्या ऑक्टोबर महिन्यांत मंडळाचें वार्षिक स्नेहसंमेलन श्रीमान् वासुदेवराव नाशीक यांच्या अध्यक्षतेखाली पार पडलें. अनायासें श्री. शंकरराव किर्लोस्कर

यांचें आगमन त्याच सुमारास झालें असल्याने चर्चा, लघुव्याख्यानें आणि साहित्यिक अनुभव यांचीहि जोड मिळाली. श्री. सौ. प्रभावतीबाओी केसकर यांचें काव्यगायन झालें. अध्यक्षांनी पुस्तकांसुद्धा अेक कपाट देण्याचें आश्वासन दिलें.

श्री. वि. स. खांडेकर हे येथे आल्यावेळीं मंडळाने अितर वाङ्मयीन संस्थांच्या सहकार्याने त्यांच्या जाहीर व्याख्यानाचा अेक कार्यक्रम केला. 'मराठी ललित वाङ्मयाचीं वैशिष्टयें' हा त्यांचा विषय होता.

**परिषदेच्या परीक्षा—** चालू वर्षी मराठवाड्यांत अेकूण सहा ठिकाणीं केंद्रें अुघडलीं गेलीं. परभणी, नांदेड, औरंगाबाद, आंबेजोगाओी, हैदराबाद आणि हिंगोली. अशा प्रकारें अभ्यासयोजना यशस्वी होत आहे.

**कै. गडकरी-स्मृतिदिन—** मराठी ग्रंथसंग्रहालय आणि अितरहि वाङ्मयीन संस्था यांच्या सहकार्याने ता. २२ व २३ जानेवारी रोजीं गडकरी-स्मृतिदिन साजरा करण्यांत आला. श्री. दि. कृ. केळकर आणि सौ. सुशीलाबाओी फाटक यांच्या अध्यक्षतेखाली निरनिराळ्या अभ्यासकांचीं भाषणें, गडकऱ्यांच्या कवितांचें गायन आणि बालहनुमानसंघाकडून अेकूण सहा प्रवेशांचें नाट्य असा विविध प्रकारांनी मनोरंजक व यशस्वी कार्यक्रम झाला. अुस्मानिया विद्यापीठ मराठी संघ आणि निझाम कॉलेज मराठी साहित्य संघ यांच्या वतीनेहि गडकरी-स्मृतिदिन साजरा करण्यांत येअून व्याख्यानें वगैरे झालीं.

**बालहनुमानसंघ—** संघाचा वार्षिकोत्सव महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध संपादक श्री. शं.वा. किर्लोस्कर यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला.

**मराठी ग्रंथसंग्रहालय—** सांगली येथील महाराष्ट्र साहित्य संमेलनास जाअून आलेल्या सज्जनांकडून येथील समाजास 'संमेलनफलश्रुति' अैकविण्याचा कार्यक्रम संग्रहालयाकडून प्रा. काकासाहेब जोशी यांच्या अध्यक्षतेखाली करण्यांत आला.

**मराठवाड्यांत माडखोलकर—** श्री. गं. त्र्यं. माडखोलकर हे मराठवाड्यांत बऱ्याच ठिकाणीं आले आणि त्यांनी औरंगाबाद, परभणी, नांदेड, पैठण अित्यादि ठिकाणांस कांही भेटी दिल्या.

**मराठी सेवक मंडळ—** साहित्यविषयक अगदी छोट्या छोट्या परीक्षा सुरू करून प्रस्तुतचें मंडळ कांही अुत्साही विद्यार्थ्यांकडून चालविलें जात आहे. या वर्षी यांच्या वतीने परीक्षाहि घेण्यांत आल्या आहेत.

**संमेलनवार्ता—** नांदेडच्या साहित्यसंमेलनानंतर स्थायी समितीच्या सर्वसाधारण सभासदांची नोंदणी चालू आहे. वाङ्मयीन संस्थांचें अेकीकरण या अुद्देशासाठी सर्व वाचनालयांची माहिती गोळा करण्यांत येत आहे. सभासदनोंदणीनंतर लवकरच प्रत्यक्ष ठरावांची अंमलबजावणी करण्यासाठी प्रयत्नांस आरंभ होअील.

**प्रकाशनवृत्तान्त—** कै. धर्मवीर वामनराव नाअीक यांचें अेक चरित्र येथील चं. गो. मस्की यांनी प्रकाशित केलें आहे.

रा. दि. ना. पळशीकर यांनी कै. प्रा. गोविंदराव नाअीक यांच्या स्मृतीस अर्पण म्हणून अेक प्रातिनिधिक काव्यसंग्रह छापावयास घेतला असून तो आता लवकरच बाहेर पडेल.

**न. शे. पोहनेरकर**

## गोमंतक

**पुस्तकप्रकाशन--** गेल्या तिमाहीच्या शेवटीं **मधली भिंत** हा श्री. जनार्दन जगन्नाथ शिंक्रे या नवोदित तरुण लेखकाचा कथासंग्रह प्रसिद्ध झाला. त्यांत पांचच कथा असून 'मधली भिंत' ही कथा प्रसिद्ध फ्रेंच कादंबरीकार अेमील झोला याच्या 'अेका बाअीचें वशीकरण' या आशयाच्या नांवाच्या कादंबरीच्या आधारें रचलेली आहे. 'दीपगृह' व 'वंचना' या दोन इयूलियु दान्तश् या पोर्तुगीज लेखकाच्या कथांचीं भाषान्तरें आहेत. 'चुकलेले वाटसरू' व 'फसवणूक' या दोनच कथा काय त्या स्वतः लेखकनिर्मित आहेत. तथापि रचना व विशेषतः भाषेची सहजता यांच्यामुळे लेखकाने स्वतःविषयी वाचकांच्या मनांत आशा निर्माण केली आहे.

**वामनराव जोशी पारितोषिक--** प. वा. वामनराव जोशी यांच्या निधनाबद्दल दुःख प्रदर्शित करण्याकरिता मडगांव येथे श्री. न. दा. नाअीक] यांच्या अध्यक्षतेखाली गेल्या आक्टोबरांत भरलेल्या सभेंत मृताच्या नांवाने पारितोषिक देण्याचा विचार करण्यासाठी अेक समिति निवडण्यांत आली होती. तिची बैठक गेल्या डिसेंबरांत डॉ. आ. गो. बोरकर यांच्या अध्यक्षतेखाली नवीन गोवें येथे भरून अेक योजना तयार करण्यांत आली असल्याचें कार्यवाह श्री. लक्ष्मणराव सरदेसाअी यांनी प्रसिद्ध केलें आहे. हें पारितोषिक अेक हजार रुपयांच्या व्याजांतून दर तीन तीन वर्षांनी अेकदा गोमांतकीय लेखकाच्या अुत्कृष्ट साहित्यकृतीस द्यावयाचें असून मूळ निधि महाराष्ट्रांतील कोणत्यातरी साहित्यसंस्थेच्या आधीन करावयाचा आहे अेवढाच योजनेचा भाग प्रसिद्ध झालेला आहे.

**साहित्यविषयक व्याख्यानमाला—** मडगांव येथील 'सारस्वत ब्राह्मण समाज' या संस्थेच्या विद्यमानें प्रतिवर्षी अेक व्याख्यानमाला गुंफिली जाते. दिवस वक्त्यांच्या सोअी-सवडीनुसार ठरविण्यांत येतात. यंदाची माला ता. २३ ते २७ डिसेंबर हे पांच दिवस झाली. पहिलें व्याख्यान कर्नाटक कॉलेजचे प्राध्यापक व विनोदी लेखक वि. मा. दी. पटवर्धन यांचें 'साहित्यांतील सौंदर्य' या विषयावर झालें. ज्या वाङ्मयांत असंतोषाचा अुच्चार अुचित वास्तवता राखून झालेला असतो आणि ज्यांत अुदात्तीकरण, म्हणजे सामान्याला असामान्यत्व दिलेलें, असतें तें वाङ्मय सुंदर अतअेव आकर्षक ठरतें असा सिद्धान्त व्याख्यात्यांनी अनेक अुदाहरणें देअून मांडला.

दुसऱ्या दिवशीं 'ललितलेखकाचा दर्जा शास्त्रज्ञ व तत्त्वज्ञ लेखकांच्या बरोबरीचा होअूं शकेल काय?' या विषयावर चर्चा झाली. सांगलीस भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनांत चर्चेसाठीं ठेवलेला हाच विषय समाजाने निवडण्याचा हेतु हा की अखिल महाराष्ट्रांतील साहित्यिक अेखाद्या विषयाची चर्चा ज्या पातळीवरून करतात तिच्या मानाने स्थानिक साहित्यिक कोठे आहेत याचा स्थूल अंदाज करतां यावा. चर्चेचें अध्यक्षस्थान प्रा. वि. मा. दी. पटवर्धन यांना देण्यांत आलें होतें आणि प्रस्ताव करण्याचें काम श्री. दत्तात्रेय व्यंकटेश पै यांच्यावर सोपविण्यांत आलें होतें. चर्चेत कित्येक साहित्यिकांनी भाग घेतल्यामुळे ती बरीच रंगली आणि अध्यक्षांनीं 'ललितलेखकाचा दर्जा शास्त्रज्ञ लेखकाहून सरसच ठरेल' असा निर्णय देण्याकरता केलेलें समारोपाचें भाषण सर्वांनाच पटण्यासारखें नसलें तरी श्रवणीय झालें. चर्चेस प्रा. अनंतराव काणेकर हे प्रसिद्ध साहित्यिकहि अुपस्थित होते.

तिसऱ्या व चौथ्या दिवशीं प्रा. काणेकर यांनी 'वाङ्मयांतील आधुनिक प्रवाह' या विषयावर भाषण केलें. मराठी वाङ्मय अद्‌भुतरम्याकडून भूतदयेकडे वळलें व आज तें वास्तवतेकडे चाललें आहे हें त्यांनी अनेक अुदाहरणांनी विशद केलें व वास्तवतेच्या अुचित मर्यादा कोणत्या त्याचेंहि सुंदर दिग्दर्शन केलें. दुसऱ्या दिवशीं शंका-संशय व्यक्त करण्यास प्रारंभासच भरपूर वाव ठेवला होता व त्याचा फायदा कित्येकांनी घेतलाहि. त्यांना योग्य अुत्तरें देअून व्याख्यात्यांनी आपला विषय परिपूर्ण केला.

पांचवें व्याख्यान प्रसिद्ध कवि श्री. दा. अ. कारे यांचें 'साहित्यांतील सत्य' या विषयावर झालें. साहित्यांतील सत्य आणि व्यवहार, अितिहास, अध्यात्म व शास्त्रें यांतील सत्य यांच्यांत काय भेद असतो त्याचें त्यांनी विवेचन केलें आणि त्याच दिवशीं श्री. न. पु. सुकेरकर, बी.अे., यांनी मालेचा समारोप आपल्या मनोहर वक्तृत्वशैलीने केल्यावर हा वाग्यज्ञ संपवण्यांत आला.

द. व्यं. पै

---

# गेल्या सहामाहींमधील मराठीचा साहित्यसंसार

**तात्विक चर्चा—**

(१) सौंदर्यभावना म्हणजे काय?—ले. बा. सी. मर्ढेकर, चित्रा, दिवाळी अंक १९४३

(२) काव्यानंदाच्या कांही अुपपत्ति—ले. ग. ना. लवंदे, समीक्षक दिवाळी व त्यापुढील अंक १९४३

(३) साहित्यिकाची भूमिका कोणती—ले. ग. य. चिटणीस, समीक्षक ,, ,,

(४) अुद्याच्या साहित्याचें मूल्यमापन—ले. ,, यशवंत, नोव्हें. ,,

(५) आजअुद्याची मराठी रंगभूमि—ले. प्र. श्री. कोल्हटकर, ध्रुव, डिसेंबर ,,

(६) मराठी रंगभूमीवरील जीर्ण संकेत—ले. गो. के. भट, समीक्षक, दि. अं. ,,

(७) मराठी रंगभूमीवरील शृंगार—ले. व. शां. देसाअी, वि. वृत्त ,, ,,

(८) साहित्य आणि संगीत—ले. वि. कृ. जोगळेकर, सह्याद्रि, ऑगस्ट ,,

(९) साहित्यकाराचें चारित्र्य आणि साहित्यकृतीचें मूल्यमापन— ले. द. के. केळकर, मौज, दि. अं. ,,

(१०) जीविकावादाचीं अपत्यें—ले. ग. त्र्यं. माडखोलकर ,, ,, ,,

(११) सौंदर्य–वस्तुनिष्ठ कीं व्यक्तिनिष्ठ—ले. वि. ह. कुलकर्णी ,, ,, ,,

(१२) ललितवाङ्मय आणि शास्त्रीय दृष्टि—ले. अ. आ. काणेकर ,, ,, ,,

(१३) कथा कीं लघुकथा—ले. मा. श्री. परांजपे सह्याद्रि, जानेवारी १९४४

(१४) काव्यदेवतेचें माटेकृत वस्त्रहरण—ले. वि. ह. कुलकर्णी, महाराष्ट्र प्रतिभा पुष्प १ लें ,,

(१५) शाकुंतलामधील प्रमेय—ले. गो. के. भट, चित्रा, दि. अं. १९४३

**समीक्षण-परीक्षणें—**

(१) 'सौंदर्यशोध आणि आनंदबोध'—परीक्षक, अजितकुमार, चित्रा, दि.अं. १९४३
(२) ,, ,, ग. ना. लवंदे, वि.वृत्त ,, ,,
(३) मधुपर्क आणि मानसमेघ ,, रा. श्री. जोग, सह्याद्रि, जाने. १९४४
(४) चंदनवाडी आणि राजकीय कादंबरी ,, वसंत कानेटकर, यशवंत ,, ,,
(५) गडकरी वाङ्मयाचें पुनर्मापन ,, माधव मनोहर, म. प्रतिमा पुष्प १ लें

**विशेषांक—**

(१) गडकरी विशेषांक—समीक्षक, २३ जानेवारी १९४४
(२) रंगभूमि विशेषांक—सह्याद्रि, नोव्हेंबर १९४३

**समालोचनें—**

(१) प्राचीन मराठी ग्रंथांचें आरंभींचें संपादन-प्रकाशन—ले. अ. का. प्रियोळकर, म. प्रतिमा पुष्प १ लें
(२) प्राचीन मराठी कवितेचें संशोधन—ले. ज. र. आंजगांवकर, म. प्रतिमा पुष्प १ लें
(३) मराठशाहींतील राजपुरुषांची साहित्यसेवा—ले. दि. वि. काळे, सह्याद्रि, डिसें. १९४३
(४) वाङ्मय-परिचय—प्र. मुंबअी अुपनगर संमेलन.

**साहित्यिकांचा परिचय—**

(१) शैलीकार माटे—ले. प्र. के. अत्रे समीक्षक, दिवाळी अंक १९४३
(२) श्री. वामनराव जोशी—अनेक लेखक धनुर्धारी ,, ,,
(३) श्री. विष्णुपंत औंधकर—ले. व. शां. देसाअी ,, ,, ,,
(४) श्री. द. वि. आपटे—ले. दि. वि. काळे, सह्याद्रि, डिसेंबर ,,

**अुल्लेखनीय प्रकाशन—**

(१) स्मरण-सांखळी—ले. कमळाबाअी देशपांडे (शैक्षणिक स्मृति)
(२) व्यक्तिरेखा—ले. ग. त्र्यं. माडखोलकर (व्यक्तिविषयक लेखसंग्रह)
(३) ग्रह आणि तारे—ले. सत्यग्राही (कांहीं स्वभावाचित्रें)
(४) विचारलहरी—ले. वा. म. जोशी (स्फुट लेख)
(५) रसवंतीची जन्मकथा—ले. श्री. म. माटे (काव्यतत्त्वचर्चा)
(६) हिमसेक—ले. पु. शि. रेगे (काव्यसंग्रह)
(७) मानसमेघ—ले. गिरीश ,,
(८) मधुपर्क—ले. पु. मं. लाड ,,
(९) विसर्जन—ले. वि. म. कुलकर्णी (काव्य-प्रेमकथा)
(१०) विष्णुदास—ले. वा. ग. भावे (आद्य-नाटककार-चरित्र)
(११) कला म्हणजे काय—अनुवादक साने गुरुजी (टॉलस्टॉयूच्या What is Art चा अनुवाद)
(१२) साहित्यधारा—ले. श्री. म. माटे (लेखसंग्रह)
(१३) जीवनकथा—ले. ना. गो. चापेकर (आत्मचरित्र)

**नवीन मासिकांचें आगमन—**

(१) समीक्षक-पुनरुत्थान—संपा. प्र. के. अत्रे, मुंबअी
(२) वसंत—संपा. द. काटदरे ,,
(३) महाराष्ट्र-प्रतिभा—संपा. गं. दे. खानोलकर ,,
(४) महाद्वार—संपा. य. न. कुलकर्णी, कोल्हापूर

**साहित्यसेवकांचे मृत्यु—**

(१) श्री. द. वि. आपटे १७-१०-१९४३ (अैतिहासिक ग्रंथरचना व लेखन)
(२) श्री. वि. रा. शिंदे २-१-१९४४ (कानडी-मराठीसंबंधविषयक लेखन)
(३) श्री. वा. ग. जोशी १२-१-१९४४ (ग्रंथप्रकाशन व चित्रमयजगत्, ध्रुव, शालापत्रक यांचें संचालन)

---

# भाषाभगिनींचा साहित्यसंसार

## हिंदी

**अर्ध कथानक—** तीनशें वर्षांपूर्वी कविवर बनारसीदास यांनी लिहिलेली काव्यात्मक आत्मकथा मुंबअीच्या हिंदी ग्रंथरत्नाकरने प्रकाशित केली आहे. तत्कालीन स्थितीचें चित्रण या काव्यांत असल्याने तें वाचनीय झालें आहे.

**सिंह सेनापति** (ले. राहुल सांकृत्यायन)— बौद्धकालीन अेका कथेच्या आधारें ही कादंबरी लिहिली आहे. तक्षशिला येथील विद्यापीठ, वैशाली नगरांतील घटना व राज्यपद्धति यांबद्दलची चर्चा व वर्णन पुस्तकांत आहे. साम्यवादी प्रचाराची भूमिका कांहीं ठिकाणीं स्पष्ट दिसून येते. कलेच्या दृष्टीने कादंबरीची रचना करण्याचा लेखकाचा अुद्देश दिसत नाहीं.

**दिनके तारे** (ले. नरोत्तमप्रसाद)— यथार्थवादी घटनांचें चित्रण या कादंबरींत आहे.

**त्रिफला—** संशोधनपूर्वक पुस्तक लिहिलें आहे. अशा पुस्तकांची हिंदींत अुणीव आहे.

**मन्त्र** (ले. भुवनेश्वरसिंह, मुजफरपूर)— भक्तिरसात्मक अशा आधुनिक कवितेचें हें छोटेंसें पुस्तक आहे. **मातृवन्दना** (ले. भागवत)— या पुस्तकांत भारतमातेस वंदना करणाऱ्या कविता आहेत. त्यांचा अुपयोग शाळेंतील विद्यार्थ्यांसच होअील. **सीमा** (ले.सत्यभूषण योगी), **अगीत** (ले. अरविन्द, पटना), **भूले गीत** (ले. वीरात्मा, नागपूर), **स्तालिन गढका आलहा** (ले. खेमसिंह नागर), अि० कवितांचीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. नागरी प्रचारिणी सभा, काशी, या संस्थेचा अर्धशताब्द अुत्सव स्वामी भवानीदयाल संन्यासी या विद्वान हिंदी लेखकाच्या अध्यक्षतेखाली काशी येथे साजरा झाला. या प्रसंगीं नागरी प्रचारिणी पत्रिकेचा विक्रमांक प्रकाशित करण्यांत आला. नाटकें, प्राचीन साहित्याचें प्रदर्शन, महिला साहित्य परिषद् यांची योजना केली होती. ग्रंथप्रकाशन व ग्रंथसंग्रहाच्या रूपाने या संस्थेने हिंदीची अमूल्य सेवा केली असून हिंदी साहित्य सम्मेलनासहि याच सभेने जन्म दिलेला आहे.

अनुक्रमणिका

—हिंदी साहित्य सम्मेलनाचें ३२ वें अधिवेशन नाताळमध्ये जयपूर येथे भरावयाचें होतें, पण अध्यक्षनिवडींतील वादामुळे तें स्थगित झालें. ऑस्टरच्या सुट्टींत किंवा मे महिन्यांत हें अधिवेशन साजरें होईल असें वाटतें.

—भोजपुरी, मैथिली, मागधी, बुन्देली, अवधी यांना प्रांतीय भाषा मानून त्या त्या शाळांतून त्या त्या भाषेची क्रमिक पुस्तकें तयार करावीं व ती भाषा माध्यम करावी अशी चळवळ सुरू आहे. या सर्व बोली असून या भाषीयांची साहित्यिक भाषा आज हिंदीच आहे, तथापि प्रांतिक बोलींच्या अभिमानी वर्गाने हा आग्रह चालविला आहे.

—श्रमजीवी लेखक मंडळ अशी संस्था लखनौस निघाली असून तिचा उद्देश लेखकांना आपल्या लेखनाबद्दल योग्य मोबदला मिळावा असा आहे.

—'हिंदूपदपादशाही' स्थापन करण्याचें ध्येय मराठ्यांचें नव्हतें असा प्रश्न श्री. लक्ष्मीप्रसाद पांड्ये यांनी 'विशाल भारत' (डिसेंबर)मध्ये मांडला आहे.

## गुजराती

(चालू परिस्थितीचा अितर प्रांतीय भाषांप्रमाणेच गुजरातीवरहि परिणाम होअून ग्रंथप्रकाशन मंदावलें आहे. कांही थोडीं नांव घेण्यासारखीं पुस्तकें खालीं दिलीं आहेत.)

(१) **कादंबरी**— 'राजकन्या' / कर्णावती } — श्री. धूमकेतु– सर्वश्रेष्ठ गुजराती कथालेखक.
जिगर अने अमी— श्री. चुनीलाल वर्धमान शाह.
प्रभु पधार्या— श्री. मेघाणी– प्रख्यात लोकसाहित्यकोविद.
धरतीनी पुत्री— श्री. किसनसिंह चावडा.

(२) **काव्य**— 'बिंदु'— सानेटसंग्रह. श्री. रामप्रसाद शुक्ल (पुरोगामी व वेधक काव्यसंग्रह).
'अुर्मिला'— श्री. मुकुन्द पाराशर्य.

(३) **नाटक**— पृथ्वीनां आंसु— नाटिकासंग्रह. श्री. दुर्गेश शुक्ल. (तंत्रशुद्ध, काव्यमय व प्रमेयनिष्ठ नाटिकासंग्रह).

(४) **चरित्र**— मारी बिनजबाबदार कहाणी— श्री. कनैयालाल मुनशी.

(५) **साहित्य टीका**— गुजराती काव्यनी रत्नाकला— कविवर्य खबरदार (व्याख्यान संग्रह).
नवीन कविताविषे व्याख्यानो— प्रो. ब. क. ठाकोर.
संस्कृत नाट्यशास्त्रना विकासनी रूपरेखा— प्रो. डोलरराय मांकड.
चारणो अने चारणी साहित्य— श्री. मेघाणी (मूलग्राही ग्रंथ).

**कविसम्राट् नानालाल** यांच्या साहित्यसेवेला पन्नास वर्षे झालीं म्हणून अभिनंदनसमारंभ मुंबअींत साजरा करण्यांत आला. कवींनी ८० च्या वयांत आपल्या 'कुरुक्षेत्र' महाकाव्याच्या अनुसंधानाने 'हरिवंश'पद्धतीचें दार्शनिक महाकाव्य लिहावयास घेतलें आहे. **दि. ब. कृष्णलाल मो. झवेरी**— गुजराती साहित्याचे अितिहासकार व समीक्षक व प्रसिद्ध अितिहासपंडित— आणि **प्रो. ब. क. ठाकोर**—प्रसिद्ध टीकाकार व कवि—यांना ७५ वें वर्ष लागलें म्हणून ठिकठिकाणीं अभिनंदनसमारंभ झाले.

**रणजितराम चंद्रक** (पदक) — हें वार्षिक पदक यंदा कलानैपुण्याबद्दल **श्री. रसिकलाल परीख** या तरुण चित्रकाराला देण्यांत आलें आहे. (गेल्या कांही वर्षी तें साहित्याला देण्यांत आलें होतें.

यंदाचें संमेलन **बडोदा** येथे नाताळच्या सुट्टींत साजरें झालें. अध्यक्षस्थान **लेडी विद्यागौरी नीळकंठ** यांनी मंडित केलें होतें. साहित्यशाखेचे अध्यक्ष श्री. धूमकेतु, कलाविभागाचे श्री. कनु देसाई व विज्ञानशाखेचे श्री. पटवा असे शाखाध्यक्ष होते.

**गुजरात युनिव्हर्सिटी** — 'पूना युनिव्हर्सिटी' संबंधींचें प्रतिवृत्त प्रसिद्ध झाल्यापासून 'गुजरात युनिव्हर्सिटी'च्या प्रश्नाला चालना मिळाली आहे. साहित्यसंमेलनांतील मुख्य ठराव यासंबंधींचाच होता. अमदाबाद हेंच या विश्वविद्यालयाचें स्थान असावें असें सुचविलें गेलें आहे. लेडी विद्यागौरी व येथील श्रीमंत गिरणीमालक यांच्यांत विचारविनिमय चालू आहे.

**मराठीचा गुजराती अवतार** — आचार्य जावडेकर यांचें 'आधुनिक भारत', श्री. साने गुरुजींचें 'भारतीय संस्कृति', श्री. खांडेकर यांचें 'क्रौंचवध' यांचीं गुजरातीमध्ये रूपान्तरें होत आहेत.

**ना. ग. जोशी**

## कन्नड

कन्नड-साहित्य-परिषदेच्या चामराजमंदिरांत श्री. चेन्नप्पा उत्तंगी आणि श्री. हलकट्टी यांच्या तैलचित्रांचें अनावरण झालें. दोघांनीहि अर्वाचीन कन्नड वाङ्मयाची मोठी सेवा केली आहे. श्री. उत्तंगी यांनी १७ व्या शतकांतील लोकप्रिय कवि सर्वज्ञ याच्या काव्याचें संपादन व विवेचन पहिल्यानेच केलें. श्री. हलकट्टी यांनी लिंगायतांच्या वाङ्मयांतील बसवेश्वराचीं 'वचनें' संपादिलीं आहेत. १९४३ मधील सर्वांत महत्त्वाची वाङ्मयीन घटना म्हणजे शिमोगा येथे भरलेलें नाताळमधील साहित्यसंमेलन होय. अध्यक्षस्थानी प्रा. द. रा. बेंद्रे हे सुप्रसिद्ध कवि होते. त्यांचें भाषण यथार्थपणें महनीय म्हणतां येईल. तें विचारदृष्ट्या महत्त्वपूर्ण आणि भाषादृष्ट्या अत्यंत काव्यमय होतें. वाङ्मयाचें जीवनांतलें कार्य किती महत्त्वाचें आहे तें सांगून पूर्वीचें कन्नड वाङ्मय तसें होतें असें कार्य करीत त्यांनी प्रतिपादिलें. नवीन कन्नड वाङ्मयाचा धावता आढावा घेऊन त्याच्या प्रगतीची दिशाहि त्यांनी दाखवून दिली. संमेलनांत कर्णाटक विद्यापीठाविषयी चर्चा झाली. जानपद, महिला आणि युवक यांचीं शाखासंमेलनेंहि त्याच वेळीं भरलीं. कर्नाटक कॉलेजच्या कन्नड संघापुढे भाषण करतांना प्रा. मुगळी यांनी साहित्योपासनेंत परिश्रमाचें महत्त्व सांगून स्वतःस टीकाकार अथवा स्वतंत्र प्रज्ञेचा लेखक म्हणवून घेण्यापूर्वी आपली योग्यता किती वाढवावयास पाहिजे याचें विवेचन केलें.

**रं. श्री. मुगळी**

# परिषद्वार्ता



[ चिटणिसांकडून ]

मागील परिषद्वार्ता लिहिल्यानंतर ता. १२ डिसेंबर १९४३, १६ जानेवारी १९४४ व २३ फेब्रुवारी १९४४ या दिवशीं कार्यकारी मंडळाच्या सभा भरल्या.

ता. १२ डिसेंबरच्या सभेंत खालील कामें झालीं:—

(१) महाराष्ट्र विद्यापीठ समितीच्या शिफारशीबद्दल परिषदेने करावयाच्या सूचना कार्याध्यक्षांनी तयार करून पाठवाव्या असें ठरलें.

(२) धुळें येथे संमेलन भरविणाऱ्या वाङ्मयसेवामंडळाच्या कांही अधिकाऱ्यांकडून संमेलनविषयक नियमांबद्दलचें मार्गदर्शन परिषदेने करावें असें पत्र आलें होतें त्याचा विचार होऊन स्वागतमंडळ बनविण्याच्या बाबतींत मात्र स्वागतमंडळाच्या सभासदांची मर्यादा परिषदेने ठरविलेल्या प्रादेशिक विभागापुरतीच मर्यादित करावी असें ठरलें व त्याप्रमाणे साहित्यसेवामंडळास कळविण्यांत आलें.

(३) कन्नड साहित्यसंमेलनाच्या चिटणिसांकडून आलेल्या विनंतीवरून श्री. पु. मं. लाड, बेळगांव, यांस परिषदेचे प्रतिनिधि म्हणून वरील संमेलनास हजर राहण्याबद्दल विनंती करावी असें ठरलें.

(४) पत्रिकेंतील वार्षिक समालोचनाच्या कामीं याद्या वगैरे तयार करणें व या बाबतींतील अितर संपादकीय साहाय्य करणें यासाठी आपण तयार असल्याचें श्री. बापूराव नाअीक यांचें पत्र वाचून दाखविण्यांत आलें व पत्रिका-संपादकांच्या नेतृत्वाखाली श्री. नाअीक यांनी देऊं केलेलें साहाय्य आभारपूर्वक स्वीकारण्याचें ठरलें.

(५) सांगली संमेलनांत झालेल्या ठरावांच्या अंमलबजावणीविषयी करावयाच्या कारवाअीबद्दल चर्चा झाली व चिटणिसांस सूचना देण्यांत आल्या.

(६) खालील दिवंगत व्यक्तींबद्दल दुखवट्याचे ठराव करण्यांत आले:—

(१) कै. श्रीमंत नारायणराव बाबासाहेब घोरपडे, अिचलकरंजी; (२) कै. दत्तात्रेय विष्णु आपटे, पुणें; (३) कै. कॅ. डॉ. गंगाधर लक्ष्मण खिरवडकर; (४) कै. श्रीमंत महाराज खासेरावसाहेब पवार, देवास (धा.).

ता. १६ जानेवारीच्या सभेंत खालील कामें झालीं:—

(१) यंदाच्या वार्षिक वाङ्मयसंमेलनाचा विषय 'हिंदुसमाज व धर्मशास्त्र' हा ठेवण्याचें ठरलें. अध्यक्षपदासाठी म. म. श्रीधरशास्त्री पाठक यांस विनंती करण्याचें ठरलें.

(२) १९४४ सालासाठी अंदाजपत्रक तयार केलें.

(३) परिषदेतर्फे घेतल्या जाणाऱ्या परीक्षांच्या परीक्षकांस प्रत्येकीं २० रु. याप्रमाणे मानद्रव्य (ऑनेररियम) देण्यांत यावें असें ठरलें.

अनुक्रमणिका

(४) खालील दिवंगत व्यक्तींबद्दल दुखवट्याचे ठराव करण्यांत आले :—

(१) कै. केशव भास्कर कोचरेकर अिंदूर; (२) कै. कीर्तिकर, मुंबअी; (३) कै. विठ्ठल रामजी शिंदे, पुणें; (४) कै. बाबुकाका जोशी, पुणें.

ता. २३ फेब्रुवारीच्या सभेंत खालील कामें झालीं :—

(१) 'मराठी वाङ्मयसूची' तयार करणारे श्री. शंकर गणेश दाते यांच्या वरील ग्रंथाचा प्रकाशनसमारंभ परिषदेमार्फत करण्याचें ठरलें. याच वेळीं श्री. दाते यांचा सत्कारहि करण्याचें ठरलें.

(२) खालील दिवंगत व्यक्तींबद्दल दुखवट्याचे ठराव करण्यांत आले :—

(१) कै. आयुर्वेदाचार्य श्री. पुरुषोत्तम गणेश नानल, पुणें; (२) कै. शंकर नरहर जोशी, पुणें; (३) कै. धुं. ग. अुर्फ दादासाहेब फाळके; (४) कै. सौ. कस्तुरबा गांधी.

**संमेलन**— म. सा. संमेलनाचें २७ वें अधिवेशन महाराष्ट्र रंगभूमि शतसांवत्सरिक अुत्सव प्रसंगीं सांगली येथे प्रा. श्रीपाद महादेव माटे यांच्या अध्यक्षतेखालीं ता. ५,६,७ नोवेंबर १९४३ दिवशीं भरून यशस्वी रीतीने पार पडलें. संमेलनांत अेकूण १२ ठराव संमत झाले आहेत व कार्यकारी मंडळाच्या विचारें त्यांची शक्य ती अम्मलबजावणी होत आहे.

**परीक्षा**— परिषदेच्या प्रथमा, प्रवेश, प्राज्ञ व विशारद या चार परीक्षा यंदा अेकूण २४ केंद्रांतून घेण्याची व्यवस्था झाली. प्रथमेस २६७, प्रवेशपरीक्षेस १०४, प्राज्ञपरीक्षेस २२२ व विशारदपरीक्षेस २९ याप्रमाणे अेकूण ६२२ अुमेदवारांकडून अर्ज आले, पैकी अनुक्रमें १६८, ८१, १५४ व १७ याप्रमाणे यशस्वी अुमेदवारांची संख्या आहे. या सर्व परीक्षांचे निर्णय त्या त्या केंद्राकडे व शक्यतों वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध केले आहेत. परीक्षासमितीचें वर्षांतील अेकंदर कार्य, या कामीं साहाय्य देणारे केंद्रव्यवस्थापक, परीक्षक, केंद्रें, केंद्रवार बसलेले अुमेदवार व यशस्वी अुमेदवार वगैरेविषयक सर्व माहितीचा वृत्तान्त पुढील अंकीं पाहावयास मिळेल.

**व्याख्यानसत्र**— परिषदेने चालविलेल्या व्याख्यानसत्रांतील दुसरी व्याख्यानमाला पुणें येथील संस्कृत पंडित विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनी गुंफिली. व्याख्यानाचा विषय 'अुच्चारशास्त्र' हा होता. हा विषय शास्त्रीबुवांनी 'अुच्चारशास्त्राचा परिचय', 'वर्णमालेची पाहणी' व 'मराठींतील अुच्चारविशेष' या तीन व्याख्यानांत अनुक्रमें ता. ८, ९, १० जानेवारी दिवशीं मांडला. व्याख्यानांस ठरल्याप्रमाणे नाममात्र शुल्क ठेवलें होतें. सुमारे ७५-१०० अभ्यासक प्रतिदिवशीं अुपस्थित असत. विशेषतः टिळक कॉलेज ऑफ अेज्युकेशन व ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन यांमधील विद्यार्थिवर्ग व नू. म. वि. हायस्कूलमधील शिक्षकवर्ग या तिन्ही व्याख्यानांस अुपस्थित होता, याचा येथे प्रामुख्याने अुल्लेख केला पाहिजे.

**संकीर्ण**— ता. २२ जानेवारी दिवशीं पुणें येथील टिळक कॉलेज ऑफ अेज्युकेशन या कॉलेजमधील विद्यार्थ्यांस व प्राध्यापकवर्गास म. सा. परिषदेच्या कार्याचा परिचय व्हावा या अुद्देशाने निमंत्रण दिलें होतें. या विनंतीचा स्वीकार करून कॉलेजचे प्रमुख प्रि. म. शं. गोडबोले आपल्या अितर सहकाऱ्यांसह व विद्यार्थिगणासह कार्यालयांत आले. परिषदेचे चिटणीस प्रा. वा. दा. गोखले, श्री. के. ना. काळे व कार्याध्यक्ष श्री. कृ. ग. लिमये यांनी संस्थेतील कार्याची माहिती दिली. विशेषतः प्रा. गोखले यांनी परिषदेच्या परीक्षांविषयी माहिती दिली व त्याबद्दलच्या अगर परिषदेच्या अितर कांहीं कार्याबद्दल कोणास कांहीं सूचना

करावयाच्या असल्यास त्याप्रमाणे करण्याबद्दल विनंती केली. प्रि. गोडबोले यांनी हल्ली विद्यापीठातर्फे होणाऱ्या परीक्षा म्हणजे नुसत्या स्मरणशक्तीचे प्रयोग होत असें सांगितलें. शिक्षणाचा व परीक्षांचा आद्य हेतु जो आत्मप्रकटीकरण (self-expression) तो यांत मुळीच साध्य होत नसल्याचें सांगून हा हेतु जेणेंकरून साध्य होईल अशा तऱ्हेची परीक्षापद्धति परिषदेने अंगीकारावी असें सांगितलें. आभारानंतर चहापान होऊन हा कार्यक्रम संपला.

सुप्रसिद्ध हिंदी साहित्यिक पं. सुदर्शन यांनी परिषद्कार्यालयास भेट दिली.

**सातारा विभाग शाखा-सभा**— म. सा. परिषदेच्या सातारा-औंध-फलटण-विभागाचे नियामक मंडळावरील प्रतिनिधि श्री. रा. स. ढवळे, अेम्. अे., अेल्अेल्. बी. यांनी सातारा येथे म. सा. परिषदेची शाखा-सभा स्थापन करण्यासाठी स्थानिक साहित्यप्रेमी प्रमुख मंडळींशीं चर्चा करून व पुरेसे सभासद नोंदवून परिषदेचे अेक चिटणीस श्री. के. नारायण काळे यांस अधिक चर्चा करण्यासाठी व पुढील कार्यास सुरुवात करण्यासाठी बोलावून घेतलें होतें. त्याप्रमाणे श्री. काळे हे साताऱ्यास जाअून त्यांनी श्री. ढवळे यांनी बोलावलेल्या खाजगी चर्चासभेंत परिषदेच्या चालू कार्याची माहिती सांगितली. ही सभा सातारा येथील कन्याशाळेच्या सभागृहांत भरली होती. अध्यक्षस्थानीं तेथील लोकप्रिय पुढारी श्री. भाअूसाहेब सोमण यांची योजना झाली होती. ६० ७५ मंडळी अुपस्थित होती. श्री. काळे यांच्या भाषणानंतर कांही प्रश्नांवर साधकबाधक चर्चा होअून सातारा येथे परिषदेची शाखासभा स्थापन करण्याचा प्रयत्न अेकमताने मान्य करण्यांत आला. अुपस्थित सद्गृहस्थांपैकी श्री. व्ही. अेन्. पाटील, श्री. वीरकर, डॉ. आठल्ये, श्री. सुखठणकर, श्री. मोडक वगैरे मंडळींनी चर्चेंत भाग घेतला होता. श्री. के. बा. गजेंद्रगडकर, श्री नाथ घाणेकर, श्री. सोहनी, न्यू अिंग्लिश स्कूल व कन्याशाळा यांतील शिक्षक आणि साताऱ्यांतील बऱ्याच कार्यकर्त्या व विदुषी या सभेस अुपस्थित होत्या.

## नवीन सभासद

### साहाय्यक (तहहयातांतून)

श्रीमंत शेट बापूराव रावोजी बोरावके, कोपरगांव

### साहाय्यक

रा. सा. व्ही. अेन्. केदारी, पुणें

### हितचिंतक

श्रीमंत सौ. पार्वतीबाअी बापूराव बोरावके, अहमदनगर

### तहहयात

श्री. बापुराव बंडोबा तरवडे, पुणें
,, श्रीपाद मारुती ठिगळे, अहमदनगर
,, अेम्. के. जोशी, सोलापूर

### तहहयात (साधारणांतून)

प्रा. रामचंद्र श्रीपाद जोग, पुणें
श्री. कृष्णाजी शंकर दीक्षित, पुणें

### साधारण

#### पुणें

श्री. वा. अ. अभ्यंकर
,, कृ. ना. फडके
,, सी. पं. खेर
,, श्री. ग. भालेराव
विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव
श्री. श्री. र. भिडे
,, गणेश वामन जोशी
,, रामचंद्र लिंबाजी बाचलकर
,, मधुकर मंगेश पाटकर
प्रा. रामचंद्र कृष्ण लागू
श्री. ना. पु. चितळे, चिपळूण

श्री. स. दा. आपटे, अिंदूर
,, रा. ह. मसूरकर, कोल्हापूर
,, आ. के. केतकर, पापडी
,, व. बा. मणेरीकर, नाशिक
,, म. बा. घाटे, चाळिसगांव
,, वसन्तराव मराठे, मुंबअी
,, राजाराम टाकसाळे, सेलू
,, चंद्रकांत दत्तात्रेय कामत, बेळगांव

सातारा

श्री. पु. ना. वीरकर
,, ना. वि. आठल्ये
,, वि. ना. पाटील
,, मा. दि. कुलकर्णी
,, रा. बि. बहुलेकर
,, वि. के. महाबळेश्वरकर
,, पुं. वि. गोळे
,, मा. ग. पुरके
,, कृ. के. फोलटकर
,, मा. आ. हळबे
,, बा. ग. चांदोरकर
,, ल. मो. आपटे
रा. ब. शां. स. परूळकर
श्री. वा. ना. कुबेर
,, रा. धों. अष्टेकर

श्री. ल. आ. जाजू
,, गं. रा. सोमण
,, म. गं. भागवत
,, पु. वा. गोवअीकर
,, म. पु. फिराणे
,, का. म. देशपांडे
,, के. बा. गजेंद्रगडकर
,, मे. ना. जोग
,, शि. दा. लिमये
,, श्री. गों. आठल्ये
,, म. कृ. शेवडे
,, श्री. कृ. सोवनी
,, शं. पां. गोखले
,, वि. र. करंदीकर
,, कृ. य. जोशी

सोलापूर

श्री. बी. अेम्. गुरु
,, रा. स. दिवाकर
,, अणूबाअी चांदणे
,, आ. प. शेटजाळे
,, सरस्वतीबाअी किर्लोस्कर
,, जी. आर्. मडूरकर
,, सकूबाअी धावरभाअी

---

## संलग्नसंस्थावृत्त

स्नेहसंवर्धक संघ, मिरज, या संलग्नसंस्थेचा जून १९३८ ते डिसेंबर १९४३ अखेरचा वृत्तान्त परिषदेकडे आला असून संस्थेमध्ये झालेल्या चर्चा, सत्कार, व्याख्यानें अित्यादि पांच वर्षांतील कामगिरीची माहिती त्यांत देण्यांत आली आहे.

वेंगुर्लें येथील 'अभिनव वाङ्मयमंडळा'तर्फे नाट्यशंभरी अुत्सव ता. ३० डिसेंबर रोजीं श्री. मामासाहेब वरेरकर यांच्या अध्यक्षतेखालीं साजरा झाला. स्वागताध्यक्ष श्री. राजाभाअू रेगे हे होते. रात्रौ मंडळाचे अध्यक्ष वासुदेवराव गोखले यांचें प्रास्ताविक भाषण झालें. कोकणांतील वैशिष्टयपूर्ण अशा दशावतारी खेळाचा भाग श्री. गोविंद पार्टीकर यांनी केला. नंतर श्री. बाबूराव मांजरेकर यांच्या नियोजनाखाली विविध नाट्यप्रवेश झाले. त्यांत हनुमान नाट्यमंडळाने प्रामुख्याने भाग घेतला.

ता. १ जानेवारीस मंडळाची सभा भरून तींत घटनासमिति नेमण्यांत आली.

ता. २३ जानेवारी रोजीं श्री. काकासाहेब खानोलकरांच्या अध्यक्षतेखाली गडकऱ्यांचा पंचविसावा स्मृतिदिन साजरा करण्यांत आला. —बा. शि. नाशीक, चिटणीस.

## डॉ. माधवराव पटवर्धन चतुर्थ स्मृतिदिन

सुप्रसिद्ध पंडितकवि कै. डॉ. माधवराव पटवर्धन यांचा चतुर्थ स्मृतिदिन दिनांक ५ डिसेंबर १९४३ दिवशीं म. सा. परिषदेच्या माधवराव पटवर्धन साहित्यमंदिरांत श्री. नरसिंह चिंतामण केळकर यांच्या अध्यक्षतेखाली झाला. प्रारंभीं समितीचे अेक चिटणीस श्री. गोपीनाथ तळवलकर यांनी समितीच्या कार्याचें निवेदन वाचून दाखविलें. तदनंतर समितीचे दुसरे अेक चिटणीस श्री. विठ्ठलराव दत्तात्रेय घाटे यांनी श्री. बापूराव बोरावके यांचा परिचय करून दिला व मुंबअीचे सुप्रसिद्ध चित्रकार श्री. नी. म. केळकर यांनी तयार केलेल्या डॉ. माधवराव पटवर्धन यांच्या तैलचित्राचें अनावरण करण्यास श्री. बोरावके यांस विनंती केली. अनावरणानंतर श्री. बोरावके यांनी आपलें छापील भाषण वाचून दाखविलें व माधवराव स्मारकनिधीस रोख रु. ७५० ची देणगी दिली. सौ. पार्वतीबाअी बापूराव बोरावके यांनीहि रु. १५० ची देणगी देण्याचें जाहीर केलें. यानंतर प्रा. रा. श्री. जोग यांचें 'माधव जूलियन यांची कविता व तिचा आधुनिक कवितेवर झालेला परिणाम' या विषयावर सुमारें अेक तास भाषण झालें. अध्यक्ष श्री. केळकर यांच्या समारोपानंतर परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. कृ. ग. लिमये यांचें आभाराचें भाषण होअून हा कार्यक्रम समाप्त झाला.

## नियामक मंडळाची संमेलनोत्तर भरलेली सभा

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या नियामक मंडळाची सभा सांगली येथे संमेलनप्रसंगीं ता. ७।११।४३ दिवशीं रात्रौ ८॥ वाजतां संमेलनमंडपांत भरली होती. सभेस पुढील सभासद अुपस्थित होते :—

१ श्री. बाबूराव न. जक्कल, सोलापूर; २ सौ. आनंदीबाअी शिर्के, पुणें; ३ श्री. विठ्ठलराव दत्तात्रेय घाटे, पुणें; ४ श्री. रामचंद्र सदाशिव दवळे, सातारा; ५ श्री. शरचंद्र वामन रानडे, नागपूर; ६ श्री. वि. स. खांडेकर, कोल्हापूर; ७ श्री. सोपानदेव न. चौधरी; ८ प्रा. यशवंत रघुनाथ आगाशे, धारवाड; ९ प्रा. गंगाधर बाळकृष्ण सरदार, पुणें; १० प्रा. श्रीधर बाळकृष्ण रानडे; ११ प्रा. शंकर केशव कानेटकर, सांगली; १२ श्री. के. नारायण काळे, पुणें; व १३ प्रा. वासुदेव दामोदर गोखले, पुणें.

श्री. वि. द. घाटे यांनी सुचविल्यावरून व श्री. वा. दा. गोखले यांनी अनुमोदन दिल्यानंतर श्री. वि. स. खांडेकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारलें. सभेंत खालील ठराव झाले :—

(१) सांगली येथील संमेलनांतील ठरावांची योग्य व शक्य ती अंमलबजावणी कार्यकारी मंडळाने करावी.

(२) घटना नियम ४९ अन्वये संपादकमंडळांत १ प्रा. द. वा. पोतदार, २ श्री. कृ. ग. लिमये, ३ श्री. श्री. म. वर्दे, ४ प्रा. वि. भि. कोलते व ५ श्री. वा. रा. ढवळे यांची योजना झाली.

अनुक्रमणिका

## म. सा. परिषदेच्या परीक्षांच्या अभ्यासक्रमांतील फेरफार

[खालील फेरफारांखेरीज अुर्वरित अभ्यासक्रम व पुस्तकें पूर्वीचींच आहेत— चिटणीस]

### प्रवेश

प्रश्नपत्रिका २ — व्याकरण– (१) मराठी साहित्य व व्याकरण– मोने पांचवी आवृत्ति– या पुस्तकांतील पृ. २२९ ते ३८४ पर्यंत.
(२) वृत्तें व अलंकार (वि. म. कुलकर्णी).

### प्राज्ञ

प्रश्नपत्रिका १ — गद्य– (१) मराठी निबंधकार (शं. गो. तुळपुळे).
(२) अिंदू काळे व सरला भोळे (वा. म. जोशी).

प्रश्नपत्रिका ३ — स्थूलवाचन– १ दौलत (शालेय आवृत्ति), २ निबंध, ३ मराठी साहित्य व व्याकरण– नवी आवृत्ति (मोने) पृ. १३४ ते ३९६ पर्यंत.

## महाराष्ट्र साहित्य पत्रिकेस परतभेट म्हणून येणारीं नियतकालिकें

**मासिकें**— १ किर्लोस्कर, २ स्त्री, ३ मनोहर, किर्लोस्करवाडी; ४ सह्याद्री, पुणें; ५ यशवन्त, मुंबअी; ६ चित्रमयजगत्, पुणें; ७ ध्रुव, पुणें; ८ अुद्यम, नागपूर; ९ व्यायाम, बडोदें; १० महाराष्ट्र, पुणें; ११ झारापकर, मुंबअी; १२ पुरुषार्थ, औंध; १३ विशाल भारत (हिंदी), कलकत्ता; १४ महाराष्ट्रविस्तार, न्यू दिल्ली; १५ वऱ्हाडशाळापत्रक, अुमरावती; १६ अभिरुचि, बडोदें; १७ भगिनी, पुणें; १८ आनंद, पुणें; १९ मुद्रणप्रकाश, पुणें; २० महाराष्ट्रप्रतिमा, मुंबअी; २१ हैदराबादसमाचार, हैदराबाद (द.)

**त्रैमासिकें** — १ भारत अितिहास संशोधक मंडळ त्रैमासिक, पुणें; २ संशोधक, धुळें; ३ नागरी प्रचारिणी पत्रिका (हिंदी), काशी; ४ मानसी (गुजराती), सुरत; ५ फोर्बस गुजराथ साहित्य सभा त्रैमासिक (गुजराती), मुंबअी; ६ The Quarterly Journal of the Kannad Literary Academy, Bangalore; Bulletin of the Deccan College Post-graduate Research Institute. Poona.

**साप्ताहिकें**— १ चित्रा, मुंबअी; २ नवयुग, मुंबअी; ३ चित्ररेखा, मुंबअी; ४ भवितव्य, नागपूर; ५ निजामविजय, हैदराबाद (द.); ६ अर्थ, पुणें.

**द्विसाप्ताहिकें**— १ केसरी, पुणें; २ महाराष्ट्र, नागपूर; ३ अुदय, अुमरावती.

**दैनिकें**— १ ज्ञानप्रकाश, पुणें; २ सकाळ, पुणें; ३ प्रभात, मुंबअी; ४ तरुण भारत, नागपूर.

# संपादकीय



पत्रिकेचा हा अंक उशीराने वाचकांच्या हातांत पडत आहे. मुद्रणाच्या बाबतींत सर्वत्रच विशेष प्रमाणांत अडचण भासूं लागली आहे. तशी ती पत्रिकेलाहि कागद आणि छपाओ यांबाबत जाणवली अेवढें लिहिल्यावर वाचकांच्या सद्भावनेला अधिक आवाहन करण्याची आवश्यकता नाही. अशा परिस्थितींतहि समीक्षक मासिकाचें पुनरुज्जीवन आणि महाराष्ट्रप्रतिमा, वसंत आणि महाद्वार या मासिकांचा नवावतार झाला ही गोष्ट मराठी वाचक-वर्गाच्या साहित्याविषयींच्या आस्थेचीच द्योतक समजावयास हवी. अेका साहित्यपत्रिकेला साहित्यविषयक विचारांची सर्वांगीण व भरपूर अशी चर्चा आवरणें अशक्य आहे. त्या चर्चेचा भार या नवीन नियतकालिकांनी चांगल्या प्रकाराने अंशतः तरी अुचलला आहे यांत शंका नाही. आम्ही या सर्व नियतकालिकांचें मनःपूर्वक अभिनंदन करितों.

* * *

या अंकांत आरंभीं 'कर्ण' या नांवाचें नाट्यकाव्य (का काव्यनाट्य?) दिलें आहे तिकडे वाचकांचें लक्ष आम्ही वेधूं अिच्छितों. अिंग्रजीमधील ऑपेराच्या धर्तीवर तें लिहिलें गेलें व त्याचा प्रयोग मुंबअी रेडियोवर झाला. याप्रकारचें लेखन श्री. वा. ना. देशपांडे यांनी पूर्वी लिहिलें आहे. 'कपटवेष' हें त्यांचें नाट्यकाव्य नाट्य आणि काव्य या दोन्ही गुणांनी युक्त असें आहे. त्याचा प्रयोग मात्र कोठे झाला की नाही हें माहीत नाही. श्री. मर्ढेकर यांच्या या काव्याचा प्रयोग रंगभूमीवर नसला तरी 'आकाशवाणी'वर झाला; आणि तो यशस्वी ठरला असें समजतें. मराठी कवींच्या प्रतिभेस हें दालन अेका अर्थाने प्रथमच खुलें झालें आहे असें म्हणतां येअील. या गोष्टीचा त्यांनी अवश्य विचार करावा.

* * *

गेली तिमाही म्हणजे वार्षिक संमेलनांची पर्वणीच होय. महाराष्ट्र-साहित्य-संमेलन नोव्हेंबर महिन्यांत झाल्यावर नाताळांत कानडी व गुजराती साहित्यसंमेलनें झालीं. गुजरात-साहित्य-संमेलनांत अितर प्रांतीय भाषांच्या साहित्यपरिषदांबरोबर संबंध निर्माण करून सह-कार्य व्हावें अशी अिच्छा प्रदर्शित करणारा ठराव झाला. सध्या राजस्तान आणि हिंदी साहित्य-परिषदांबरोबर सहकार्य करण्याचा अुल्लेख झाला. प्रांतीय भाषांनी अेकमेकांबरोबर सहकार्य करून अखिल भारतीय मनोवृत्तीस पोषक असेंच धोरण आंखावें असें गुजरात साहित्य संमे-लनाचे अेक प्रमुख नेते श्री. क. मुनशी यांनी आपल्या 'सोशल वेल्फेअर' या पत्रांतहि प्रतिपादिलें. आपल्या भाषाभगिनींचा साहित्यसंसार कसा चालला आहे हें, स्थूलमानाने का होअीना, म. सा. पत्रिकेंत दिग्दर्शित होतें ही गोष्ट पत्रिकेच्या गेल्या वर्षाच्या वाचकांस दिसली असेलच. शिवाय अितर प्रांतांतील साहित्यिकांचा परिचय करून देण्याचा प्रयत्न परिषद् करीतच असते. गेल्या हिंदी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. माखनलाल चतुर्वेदी यांचा परिषदेमार्फत सत्कार करण्यांत आला. कन्नड-साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष श्री. द. रा. बेंद्रे यांचें काव्यवाचनहि करण्यांत आलें होतें. कानडी व मराठी याविषयी त्यांचीं दोन तीन व्याख्यानेंहि व्हावयाचीं आहेत. प्रसिद्ध हिंदी-अुर्दू लेखक पंडित सुदर्शन यांनीहि परिषदेस भेट देअून परिषदेच्या कार्यकर्त्यांशीं विचारविनिमय केला. म. सा. परिषदेमार्फत हे सहकार्याचे व परिचयाचे प्रयत्न गुजरात संमेलनांत ठराव होण्याच्या आधीपासूनच चालू आहेत. गु. सा. संमेलनानें हिंदी व राजस्तानी यांबरोबर मराठी या जवळच्या भाषेचा व तिच्या परिषदेचाहि

अनुक्रमणिका

अुल्लेख करावयास हवा होता असें वाटतें. भाषांचा आणि वाङ्मयाचा परिचय आणि सहकार्य होण्याच्या दृष्टीने अेक लिपि होणें फार सोअीचें आणि आवश्यक आहे. गुजराती आणि कानडी या भाषांनी देवनागरी लिपी अुचलल्यास हें बरेंच सुकर होअील.

* * *

महाराष्ट्र-युवक-साहित्य-संमेलन गेल्या महिन्यांत पुणें येथे भरलें होतें, पण तें निर्विघ्नपणें पार पडलें नाही. झाला प्रकार अुभयपक्षीं गैर झाला असें तटस्थाच्या वृत्तीने म्हणून स्वस्थ राहणें शक्य असलें तरी ही सारी घटना अर्थपूर्ण आहे असा विचार मनांत आल्याखेरीज राहत नाही. साहित्यांत युवकांची अेक निराळी संघटना असण्याची आवश्यकता आहे काय असें अनेकांच्या मनांत येणें स्वाभाविक आहे. आज असलेल्या संघटनेंत युवकांना प्रवेश मिळत नाही असें नाही. साहित्यनिर्मितीच्या बाबत प्रौढांनी कांही बंधनें युवकांवर घातलीं आहेत असेंहि नाही. तशी सत्ता अेका राजसत्तेखेरीज कोणाच्याहि हातांत आज अुरली नाही. मग 'चाळिशीवरचा प्रत्येक मनुष्य, कांही अपवाद सोडल्यास, बदमाश (scoundral) असतो' असें म्हणून युवकांनी सवता सुभा करण्यास सध्याच्या अैक्यपिपासेच्या कालांत तरी कांही सबळ कारण आहे काय ? चाळिशीच्या वरचे लेखक तरुणांचीं मनें योग्य प्रकारें जाणूं शकत नाहीत या तक्रारींत कांही तथ्य कदाचित् असेलहि. तथापि त्यामुळे युवकांच्या आत्माविष्कारावर कांही बंधनें पडतात असें तर होत नाही ? स्वतः साहित्यनिर्मिति करून आपल्या आशा आकांक्षा व्यक्त करणें आज अुपलब्ध असलेल्या संघटनेंत राहूनहि त्यांना करतां येणें शक्य आहे. तीमध्ये प्रवेश करून तिला अधिक समर्थ करून आपल्या मनासारखें वळण तिला त्यांनी अवश्य द्यावें. तिचीं प्रवेशद्वारें कोणालाहि बंद नाहीत.

साहित्यनिर्मिति करावयास संघटनेची आवश्यकता आहे की काय हा त्यापेक्षा निराळाच प्रश्न आहे. सभा-संमेलनें-संघटना करून अुत्कृष्ट साहित्यनिर्मिति होते असें नाही; व्यक्तिशः केलेल्या निरपेक्ष प्रयत्नांनींच ती होते असा आजवरचा अनुभव आहे. सभा-संघटनांनी तिला फार झाल्यास कांहीं वळण लावतां येअील. आणि या वळण लावण्याच्या प्रयत्नांमुळेच या संमेलनांत विघ्न आलें असें म्हणावयास प्रत्यवाय नाही. कोणत्याहि अेका विशिष्ट मतवादास धरून वाङ्मयनिर्मिति झाली पाहिजे असा आग्रह सुरू झाला की त्याला प्रतिक्रिया म्हणून दुसरा मतवाद पुढे येतो व संघर्षाला प्रारंभ होतो. हे मतवाद साहित्यविषयक असले तर तेवढे तापजनक होत नाहीत. ते सामाजिक वा राजकीय असल्यास अभिनिवेशाची अुत्कटता तीव्र होअून त्यांचें पर्यवसान नुकतेंच झाल्याप्रमाणे होतें. राजकीय वा सामाजिक परिषदांमधील मांडणें साहित्यपरिषदांमधून मांडण्याची जी प्रथा रूढ होअू पाहत आहे ती साहित्यनिर्मितीस पोषक होअील असें वाटत नाही. व्यवहाराच्या सोअीकरिता म्हणून या परिषदांचे विषयविभाग निरनिराळे केल्यावर अितर विभागामधील विषय तेवढ्यापुरते बाजूला ठेवण्याचें धोरण स्वीकारणेंच अिष्ट होय. साहित्य हें समाजजीवनांतून निर्माण व्हावयाचें आहे. तेव्हा समाजजीवनाला वळण लावण्याचे हे प्रयत्न सामाजिक परिषदांतून करणें योग्य होअील. तेथेंहि मतभेद व संघर्ष निर्माण होणार नाहीत असें नाही, पण तें त्याचें योग्य स्थान होय. सामाजिक जीवनाला आपल्या मनासारखें वळण लागल्यास त्याचें प्रतिबिंब साहित्यांत पडल्याखेरीज राहणार नाही.

* * *

साहित्यसंमेलनांतून आपल्यास अप्रिय वाटणारी अेखादी घटना घडून आल्यास तिचा

दोष साहित्यपरिषदेला यावयाचा ही गोष्ट ठराविक होऊन बसली आहे. संमेलनांत साहित्यपरिषदेचा भाग किती आणि स्थानिक स्वागतमंडळाचा भाग किती याविषयीच्या अज्ञानामुळे हें घडतें. पूर्वी जेव्हा अध्यक्षाच्या निवडणुकीकरता परिषदेच्या कार्यकारी मंडळाकडूनच नांवें सुचविलीं जात तेव्हा कंपूशाहीचा आरोप परिषदेवर कांही प्रमाणांत का होईना करतां येण्याजोगा होता. सध्या तेंहि निमित्त उरलेलें नाही. जळगांवांत परिषद् व संमेलन यांना मान्य झालेली परिषदेची जी घटना आहे तीप्रमाणे परिषदेच्या कोणाहि सभासदास अध्यक्षपदाकरिता कोणाचेंहि नांव सुचवितां येतें. अशीं सारीं नांवें त्या त्या व्यक्तीच्या अनुमतीकरिता त्याच्याकडे पाठविण्यांत येतात. निवडून आल्यास अध्यक्षाचें काम करण्यास आपली मान्यता असल्याचें ज्यांच्याकडून कळतें त्यांचीं नांवें परिषदेच्या नियामक मंडळाकडे मताकरिता पाठविण्यांत येतात. या मंडळांत ८० वर सभासद सर्व प्रांतांमधून परिषदेच्या सभासदांनी निवडलेले असे आहेत. त्यांना कोणत्याहि पांच नांवांना मत देण्यास सांगण्यांत येतें. सर्वांत अधिक मतें मिळालेल्यांचीं पहिलीं पांच नांवें संमेलनाच्या स्वागतमंडळाकडे परिषदेकडून जातात. या वर्षीहि अशीं पांच नांवें परिषदेकडून गेलीं होतीं. तीं नांवें पाहिल्यास परिषदेच्या नियामक मंडळाचा कौल निःपक्षपातीच होता हें कोणालाहि दिसेल. स्थानिक स्वागतमंडळाचा निर्णय कोणासारखा होतो याची जबाबदारी अर्थात् परिषदेवर येत नाही. तो केव्हा अेकासारखा, तर केव्हा दुसऱ्यासारखा होणार. तें स्थानिक लोकमतावर अवलंबून असतें. त्या लोकमताच्या निर्णयास त्या काळापुरती कां होईना मान्यता देणें हें समंजसपणाचें होय. गेल्या अध्यक्षीय निवडणुकीविषयी कोणत्याच प्रकारचें मत प्रकट न करितां परिषदेच्या वतीने सांगावयाची प्रस्तुत गोष्ट अेवढीच की कंपूशाही साहित्यपरिषदेंत नाही.

* * *

पत्रकार व साहित्यिक यांच्यामध्ये जें द्वैत नुकतेंच निर्माण झाल्यासारखें दिसत आहे तें विचारास चालना देणारें आहे. पत्रकारसंमेलनाच्या अध्यक्षांनी साहित्यिक हे पत्रकारांचे अनुज असल्याचें सांगून अनुजास योग्य अशा पद्धतीने त्यांनी पत्रकारांशी यागावें असें सुचविलें. पत्रकार आणि साहित्यिक यांचा अग्रजानुजांचा हा संबंध साहित्यिकांस कितपत मान्य होईल हें सांगतां येत नाही. निदान तो चिन्त्य आहे यांत शंका नाही. तथापि तो खरा आहे असें मानूनहि ही बंधुभावाची वागणूक अुभयपक्षीं व्हावी अशी अपेक्षा कोणीहि करील. अेकमेकांविषयी योजावयाच्या भाषेमध्ये आजवर अमर्यादा झाल्याचीं अुदाहरणें लक्षांत घेतल्यास पत्रकारांचें पारडें जमीन सोडून वर येणें कठीण वाटतें. सार्वजनिक जीवनांत शक्य तो व्यक्तिनिरपेक्ष विचार व्हावा ही गोष्ट अिष्ट होय. पण स्तुतीकरिता किंवा निंदेकरिता आजच्या वर्तमानपत्रीय जगांत वैयक्तिक लेखन फार होत आहे ही गोष्ट पत्रकारांनाहि पटेल असें वाटतें. लेखनांत वैयक्तिकता आली की जिव्हाळा वाढतो हें खरें पण मग योजिलेल्या भाषेंतहि अुत्कटता किंवा तीव्रता अधिक येते. तिची सवय झाली की केवळ व्यक्तीसंबंधीच नव्हे तर सबंध वर्गासंबंधी त्याच प्रकारचीच भाषा योजण्यांत येते. कवि, साहित्यिक, प्राध्यापक, पदवीधर, मध्यमवर्गीय लोक यांसंबंधी सरसकट निंदागर्भ भाषा योजण्यांत येते तिचें समर्थन कोणाहि पत्रकाराला करतां येअील असें वाटत नाही. स्वतःवर झालेल्या आघाताच्या प्रसंगाने पत्रकारांची दृष्टि थोडी अंतर्मुख झाल्यास या अनिष्ट वादांतूनहि कांही अिष्टप्राप्ति झाली असें होअील.

# साभार स्वीकार



राजकीय सत्यकथा—लेे० शरश्चंद्र गुण्ये; प्रका० शं.वा.कुलकर्णी, मुंबअी; मूल्य १। रु.

भावपूर्णा—लेे० रा. अ. काळेले; प्रका० त्रि. अ. माअीणकर, अिंदूर; मूल्य १। रु.

जुनागड—लेे० वि. स. गोगटे; प्रका० कृ. वा. मराठे, बडोदें; मूल्य सहा आणे.

अंतरंग—लेे० मा. दा. आळतेकर; प्रका० पां. ना. बनहट्टी, नागपूर; मूल्य रु. तीन.

'विष्णुदास' विष्णु अमृत भावे—लेे० व प्रका० वा.ग.भावे, सांगली; मूल्य २ रु.

साहित्यधारा—लेे० व प्रका० श्री. म. माटे; मूल्य रु. अडीच.

रसवंतीची जन्मकथा—लेे० व प्रका० श्री. म. माटे; मूल्य रु. अडीच.

हिमसेक—लेे० पु. शि. रेगे; प्रका० सरिता पु. रेगे; मूल्य दीड रुपाया.

काव्यप्रभा—लेे० व प्रका० प्रभाकर दिवाण, सेवाग्राम, वर्धा; मूल्य अेक रुपया.

बडोदें राज्यदप्तरांतील अैतिहासिक वेंचे खंड ७ वा– अि. स. १८१९ ते १९२५– प्रका० स्टेट रेकॉर्ड डिपार्टमेंट, बडोदें; मूल्य दोन रुपये.

श्रीज्ञानेश्वरीदर्शन—भाग पहिला– संपा० व प्रका० न. बा. देशमुख, अहमदनगर; मूल्य सहा रुपये.

श्रीज्ञानेश्वरीदर्शन—भाग दुसरा– संपा० व प्रका० न. बा. देशमुख, अहमदनगर; मूल्य सहा रुपये.

नाट्यचर्चा—संपा० गोडबोले, राणे, केतकर, हेरवाडकर; प्रका० डॉ. गं. ल. खिरवडकर, ग्वाल्हेर; मूल्य दोन रुपये.

स्मरणसाखळी—लेे० कमलाबाअी देशपांडे; प्रका० मनोहर म. केळकर, १९६/८५, टिळक रस्ता, पुणें; मूल्य सहा रुपये.

अैतिहासिक पोवाडे अथवा मराठ्यांचा काव्यमय अितिहास खंड दुसरा— प्रका० य. न. केळकर; मूल्य रु. १-६-६.

श्रीमुक्तिनाथ यात्रावर्णन—लेे० सौ. अुमाबाअी चापेकर; प्रका० आर्यसंस्कृति मुद्रणालय, पुणें; मूल्य अेक रुपाया.

जीवनकथा—लेे० ना. गो. चापेकर; प्रका० आर्यसंस्कृति मुद्रणालय; मूल्य सहा रुपये.

गृहदाह—लेे० प्रा. गो. के. भट; प्रका० रामकृष्ण प्रकाशन मंडळ, मुंबअी ४; मूल्य सव्वा रुपाया.

भटक्याची कमाअी—लेे० अुमाकांत मेंडे; प्रका० अीस्ट अँन्ड वेस्ट बुक हाअुस, बडोदें; मूल्य दोन रुपये.

वृत्तें व अलंकार—लेे० श्री. वि. म. कुलकर्णी, प्रका० अेन्. के. पब्लिशिंग हाअुस, पुणें २, मूल्य आठ आणे.

अनुक्रमणिका

## साभार स्वीकार

संसार--ले० संजीवनी मराठे; प्रका० दा. ना. मोघे, कोल्हापूर.
तांबडी माती--ले० बा. सी. मर्ढेकर ,,

## के. मि. ढवळे यांचीं प्रकाशनें

मानसमेघ--ले० गिरीश; मूल्य दीड रु.
सिंदबादच्या सात सफरी--ले० अ. बा. मराठे; मूल्य दहा आणे.
वाघाची मावशी--ले० द. के. बर्वे; मूल्य चार आणे.
तिस्मारखां--ले० श्री. का. रा. पालणकर; मूल्य चार आणे.
जुअी--ले० सौ. कावेरी कर्वे; मूल्य अडीच आणे.
विरामचिन्हांची मेजवानी--ले० बा. गो. नाअीक; मूल्य चार आणे.
रॉबिन्सन क्रूसो--ले० वि. स. सुखठणकर; मूल्य पांच आणे.
गोष्टया--ले० ना. धों. ताम्हणकर; मूल्य पांच आणे.
बाळ चिलया--ले० पां. श्री. टिल्लू; मूल्य तीन आणे.
चन्दू--ले० श्री. शं. खानवेलकर; मूल्य अेक रुपाया.
आमचे तात्या--ले० मा. म. वैद्य; मूल्य पांच आणे.
पऱ्याची चाळ--ले० स. ना. सूर्यवंशी; मूल्य अेक रुपाया.
बालसंभाषण--ले० प्रा. के. गो. पंडित; मूल्य सहा आणे.
बालसंभाषण-- ,, ,, आठ ,,
अुगवत्या सूर्याचा काळोख--ले० वि. वा. हडप; मूल्य तीन रुपये.
यति कीं पति--ले० साने गुरुजी; मूल्य दहा आणे.
किती हसाल ?--ले० वि. मा. दी. पटवर्धन; मूल्य अेक रुपाया.
अण्णा--ले० बा. वा. फाटक; मूल्य दोन रुपये.
यशोगिरी--ले० यशवन्त; मूल्य दीड रुपाया.
अकलेचा कांदा आणि अितर गोष्टी--ले० द. के. बर्वे; मूल्य सहा आणे.
सोनेरी नदीचा राजा--ले० सौ. मालतीबाअी दांडेकर; मूल्य आठ आणे.

---

आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता रामचंद्र श्रीपाद जोग यांनी प्रसिद्ध केलें.

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-अितिहास

(म. सा. परिषदेचें ग्रंथप्रकाशन)

वरील ग्रंथ प्रा. दत्तो वामन पोतदार यांजकडून मुद्दाम लिहवून घेतला आहे. या ग्रंथांत म. सा. परिषदेची इ. स. १९०६ ते १९४२ अखेरची व म. सा. संमेलनांची इ. स. १८७८ ते १९४२ अखेरची संपूर्ण व साधार माहिती आली आहे. मराठी भाषेच्या उन्नतिप्रीत्यर्थ स्थापन झालेल्या या आद्य व प्रातिनिधिक संस्थांची अद्यावत् माहिती या ग्रंथांत मोठ्या परिश्रमाने संकलित करण्यांत आली असून वृत्तविभागांतील प्रकरणांतून या सर्व माहितीच्या आधारें प्रा. पोतदार यांच्या मार्मिक विहंगमावलोकनाचा लाभहि वाचकांस होणार आहे. संमेलन-परिषद् या संस्थांच्या हितचिंतकांस व इतर अभ्यासकांसहि हा ग्रंथ संदर्भग्रंथ म्हणून उपयोगी पडेल अशा तऱ्हेने या ग्रंथाची मांडणी झालेली आहे. आकार रॉयल अष्टपत्री. पृष्ठें १७५. मूल्य रु. ३. सभासदांस रु. १॥. ट. ख. नि.—

चिटणीस
म. सा. परिषद्, पुणें २

अनुक्रमणिका